॥ श्री ॥

# सावित्रीचरित्र.

संपादक



हरि रघुनाथ भागवत. बी. ए.

आवृत्ति पहिली.

पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं ७७६ सदाशिव पेठ,
पुणें, येथें अष्टेकर आणि मंडळीकरितां प्रसिद्ध केलें.

शके १८३५. सन १९१३ इसवी.

किंमत सहा आणे.

# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.

स्त्रीशिक्षण हा समाजाचा पाया आहे. ज्या समाजांतील स्त्रिया सुशिक्षित नाहींत तो समाज कर्तव्यहीन व्हावयाचा. आपल्या समाजाच्या हितेच्छूंनीं हें तत्त्व ओळखून निरनिराळ्या प्रकारांनीं स्त्रीशिक्षणाची सोय करून ठेविली. आपल्या लहानमोठ्या स्त्रिया नेहमीं वेगवेगळे प्रसंगीं जीं व्रतें इत्यादि करतात ती ही सोय होय. यांपासून स्त्रियांना जें शिक्षण मिळावयास पाहिजे त्याची जाणीव जरी बरीच कमी झालेली दृष्टीस पडते तरी त्यांत मूळ उद्देश स्त्रियांना शिक्षण देण्याचाच आहे हें विसरतां कामा नये. अशा व्रतांपैकीं वटसावित्रीचें व्रत हें एक आहे. व्रत फार महत्वाचें असल्यानें स्त्रिया याला अत्यंत मान देतात. ह्मणून सावित्रीसंबंधाची माहिती स्त्रियांस चांगल्या प्रकारें व्हावी या उद्देशानें हें लहानसें पुस्तक लिहिलें आहे.

हरि रघुनाथ भागवत.

॥ श्री ॥

# सावित्रीचरित्र.

## अध्याय पहिला.

## सावित्रीचा जन्म.

फार प्राचीन काळीं हस्तिनापुराच्या उत्तरेस मद्र नांवाच्या देशामध्यें अश्वपति नामक राजा राज्य करीत होता. मद्र देश हस्तिनापुराच्या उत्तरेस होता. हल्लीं याला मद्र देश ह्मणत नसून याचा अंतर्भाव पंजाबामध्येंच होतो. हा राजा अत्यंत धर्मनिष्ठ असून आपल्या प्रजेच्या हितामध्यें दक्ष, उदार अंतःकरणाचा, सत्यप्रतिज्ञ, जितेंद्रिय, यज्ञयागादि धर्मकृत्यांमध्यें रत, दाता, आपल्या कर्तव्यामध्यें दक्ष, नगरांतील व राष्ट्रांतील सर्व प्रजेस प्रिय आणि सर्व प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर असा होता. अशा राजाच्या कारकीर्दींत सर्व प्रजा सुखासमाधानानें नांदत होती. परंतु यांत न्यून असें एकच होतें. तें कोणतें ह्मणाल तर अश्वपतीला बरींच वर्षें संतति झाली नाहीं हें होय. या गोष्टीमुळें राजाला, राणीला व इतर प्रजाजनांला वाईट वाटत असे.

अखेरीस संततिप्राप्त्यर्थ सावित्री देवीची उपासना करण्यास अश्वपतीनें आरंभ केला. सावित्री देवीचें कडक व्रत त्यानें आरंभिलें. ब्रह्मचर्याचें पालन करीत तो व्रतस्थ राहूं लागला. रोज सावित्रीमंत्रानें एक लक्ष हवन करावयाचें. याप्रमाणें तीन दिवस हवन केल्यावर

तिसऱ्या दिवसाच्या शेवटीं एकदां आहार करावयाचा. नंतर पुन्हां तीन दिवस हवन व तिसऱ्या दिवसाच्या शेवटीं आहार. या क्रमानें त्यानें अठरा वर्षे व्रत चालविलें. सावित्रीमंत्र म्हणजे गायत्रीमंत्र. सर्व मंत्रांत या मंत्रासारखा श्रेष्ठ मंत्र दुसरा कोणताहि नाहीं, असें मनुस्मृतीमध्यें देखील सांगितलें आहे. याप्रमाणें अठरा वर्षे झालीं तेव्हां एके दिवशीं हवनकुंडांतून प्रत्यक्ष सावित्री देवी प्रगट झाली आणि राजास म्हणाली---

हे राजा, तुझें शुद्ध ब्रह्मचर्य, दम, नियम आणि भक्ति यांचे योगानें मी संतुष्ट झालें आहे. तुला इष्ट असेल तो वर माग.

सावित्री देवीचें हें वचन ऐकून अंतःकरण संतुष्ट झालेला तो राजा म्हणाला. हे देवि, हें व्रत मीं कशाकरितां आचरण करीत आहें हें तूं जाणतच आहेस. माझ्या कुलाचा उद्धार करणारी व वंश चालविणारी संतति मला व्हावी हा माझा उद्देश आहे. कारण कुलधर्माचें रक्षण संततीकडूनच होत असतें. याकरितां मला संतति व्हावी हाच वर मी मागतों.

हें भाषण ऐकून ब्रह्मदेवाची पत्नी सावित्री देवी म्हणाली. हे राजा, हा तुझा मनोरथ ओळखून मीं याविषयीं अगोदरच ब्रह्मदेवापाशीं गोष्ट काढली होती. विधात्याच्या कृपेनें सर्व जगतीतलावर देदीप्यमान होणारी अशी एक कन्या तुला लवकरच प्राप्त होईल. ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून मी हें तुला वचन देत आहें.

अश्वपतीनें हें देवीचें वाक्य भक्तिपूर्वक मान्य करून तिची पुन्हां प्रार्थना केली. नंतर सावित्री देवी अंतर्धान पावली.

पुढें अश्वपति राजा गृहस्थाश्रमामध्यें राहूं लागला व पूर्वींप्रमाणें

आपल्या प्रजापालनादि कर्तव्यामध्यें मग्न झाला. लवकरच योग्य कालीं ज्येष्ठ राणीचे ठिकाणीं गर्भ राहिला. नऊ मास गेल्यावर एका मंगल दिवशीं शुभ योगावर कन्या जन्मास आली.ही कन्या सावित्री देवीच्या प्रसादानें प्राप्त झाल्यामुळें राजानें तिचें नांव सावित्री असें ठेविलें. हीच अद्वितीय राजकन्या सावित्री आपल्या चरित्राचा विषय होय.

सावित्री दिवसानुदिवस मोठी होत चालली. देवीच्या प्रसादानेंच प्राप्त झालेल्या व कुळाचा उद्धार करणाऱ्या या कन्येकडे पाहून राजाराणी आपणांस धन्य मानून घेत. आनंदाचा काळ हां हां ह्मणतां निघून जातो आणि दुःखाचा काळ मात्र जातां जात नाहीं असा मनुष्यमात्राचा अनुभव आहे. त्याप्रमाणें कन्येच्या लालनपालनामध्यें आठ दहा वर्षे केव्हांच निघून गेलीं.

सावित्री उपवर झाली तेव्हां राजकुलांतील चालीप्रमाणें आपल्या कन्येला कोणा राजपुत्राकडून मागणी येईल अशी अश्वपति राजा वाट पाहूं लागला.परंतु बराच काळपर्यंत कोणाकडून मागणी येईना. सावित्रीच्या अद्वितीय तेजानें सर्व राजपुत्र दिपून गेले व लोक ज्याप्रमाणें सूर्याच्या तेजाकडे नुसते पहातात, पण त्याच्या समीप जाण्याची इच्छा करीत नाहींत,त्याप्रमाणें ते सावित्रीची योग्यता आपल्याहून फारच मोठी आहे असें जाणून स्तब्ध राहिले, अर्थात् अश्वपति राजास चिंतेला कारण झालें. परंतु आपली कन्या देवप्रसाद आहे हें जाणून त्या राजानें सावित्रीच्या विवाहाची काळजी केली नाहीं. असल्या दिव्य कन्येला अनुरूप वर शोधण्याची जबाबदारी उगाच आपल्या शिरावर न घेतां तिच्याकडूनच तिला अनुरूप असा दिव्य पति जेथें असेल तेथें हुडकावा असा विचार करून अश्वपतीनें सावित्रीला वर

शोधून आणण्यास सांगितलें.

सावित्रीनें पित्याच्या आज्ञेप्रमाणें वरशोधनार्थ प्रयाण करण्याचें ठरविलें. एके दिवशीं पर्वकालीं स्नान करून देवतांचें पूजन करून तिनें ब्राह्मणांचे आशीर्वाद घेतले व मातापितरांस वंदन करून ती निघाली. तिच्याबरोबर अश्वपति राजानें वयोवृद्ध मंत्री व इतर योग्य लवाजमा दिला. सावित्री राजधानीहून निघाली ती अगोदर तपोवनांत गेली व तेथें तपश्चर्या करीत असलेल्या मुनिवृंदांचा आशीर्वाद घेऊन नंतर आपला मार्ग आक्रमूं लागली.

---

अध्याय दुसरा.

## नारद आणि अश्वपति यांचा संवाद.

पुढें कालान्तरानें सावित्री वर शोधण्याकरितां गेली होती ती आपलें कार्य आटोपून परत आली. आपल्यास योग्य असा पति सावित्रीनें कोणता बरें निवडून काढला ? बायकोच्या अंगावर दागिन्यांचे लंगर चढविण्यास समर्थ असलेल्या धनसंपन्न अशा एखाद्या पतीला तिनें पसंत केलें नाहीं अथवा हत्तीच्या अंबारींतून बड्या राजधानीच्या शहरीं मोठ्या थाटमाटानें वरात काढण्यास समर्थ असलेल्या ऐश्वर्यसंपन्न अशा एखाद्या पतीला पसंत केलें नाहीं. वास्तविक सावित्रीवर ही एक मोठी चमत्कारिक जबाबदारीच येऊन पडली होती. कन्येला योग्य वर शोधण्याचें काम पित्याचें आहे असें धर्मशास्त्रकारांनीं ठरविलें आहे. परंतु क्वचित् प्रसंगीं बिकट स्थिति प्राप्त झाल्यामुळें पित्यानें कन्येच्या विवाहाकरितां कांहीं तरी निराळी युक्ति योजलेली आपल्या पुराणग्रंथांतून आढळते. विशेषतः राजे लोकां-

पुढें असला बिकट प्रश्न उत्पन्न होतो. त्यांतून राजा मांडलिक असला ह्मणजे तर हा प्रश्न फार बिकट होतो. कारण आपल्या कन्येला बरोबरीच्या दर्जाचा वर मिळावा ही एक इच्छा आणि त्याचप्रमाणें कोणाहि राजाला किंवा राजपुत्राला न दुखवितां कन्येचा विवाह पार पडावा ही दुसरी इच्छा. अशा दुहेरी पेचांत कोणी कोणी राजे सर्व विवाहेच्छु राजांना व राजपुत्रांना बोलावून आणून त्यांपैकीं वर पसंत करण्याचें काम आपल्या कन्येवर सोंपवीत अथवा एखादा पण लावून तो जिंकणाराला आपली कन्या अर्पण करीत. कन्या उपवर झाल्यावर कोणा योग्य राजपुत्राकडून मागणी आली तर ठीकच; नाहीं तर वरील दोन प्रकारांनीं कन्येचा विवाह करावयाचा असा त्या काळच्या राजघराण्यांचा परिपाठ असावा असें दिसतें. अश्वपति राजाला आपली कन्या साधारण मनुष्यकोटींतील नसून दिव्यकोटींतील आहे असें वाटत असल्यामुळें त्यानें वरील दोन मार्गांपैकीं कोणत्याहि मार्गाचा अवलंब न करितां सावित्रीलाच प्रयाण करण्यास पाठविलें. सावित्रीनेंहि आपल्या पित्याची कल्पना खरी करून दाखविली. सावित्रीनें आपल्या दिव्य दृष्टीनें सद्गुणांची परीक्षा केली; धनाची अथवा ऐश्वर्याची किंमत मानिली नाहीं; आणि सत्यवान् नामक पूर्वी राजपुत्र असलेल्या परंतु आतां राज्यभ्रष्ट होऊन रानावनांत भटकणाऱ्या वरास वरण्याचा निश्चय केला. यावरून सद्गुणांपुढें द्रव्याची मातब्बरी बिलकूल नाहीं हें तत्त्व सावित्रीनें स्वतःच्या उदाहरणानें शिकविलें यांत संशय नाहीं.

याप्रमाणें पित्यानें सोंपविलेली जबाबदारीची कामगिरी मोठ्या चातुर्यानें पार पाडून सावित्री परत राजधानीस आली. पित्याचें दर्शन घेऊन त्याचा आशीर्वाद मागण्यासाठीं ती राजवाड्यांत येते तों तेथें नारद-

मुनि आलेले तिनें पाहिले. त्याबरोबर सावित्रीनें त्यांना प्रणाम करून नंतर आपल्या पित्यास प्रणाम केला. देवर्षि नारदांचें आगमन ह्मटलें कीं तेथें कांहीं तरी सत्त्वाची परीक्षा आहे असें समजावें. मनुष्याच्या अंगांत अनेक सद्गुण असतील, परंतु जोंपर्यंत ते संकटांच्या कसोटीला लागलेले नाहींत तोंपर्यंत त्या सद्गुणांचें अस्तित्व असल्याची कबूली कोणीं देतां उपयोगी नाहीं. अग्नीमध्यें ज्याप्रमाणें सुवर्णाची परीक्षा होते त्याप्रमाणें संकटामध्यें मनुष्याच्या सद्गुणांची परीक्षा होते. संकटामध्यें देखील सद्गुण खरे ठरले तरच ते खरे; एरवीं ते आहेत ह्मणणें काय आणि नाहींत ह्मणणें काय सारखेंच. अशा तऱ्हेची परीक्षा देवर्षि नारदांनीं केल्याचें व तेणेंकरून सत्त्वशील स्त्रीपुरुषांच्या धैर्याचें, कर्तव्यबुद्धीचें व चारित्र्याचें उदाहरण पुढील पिढींस आदर्श ह्मणून ठेवल्याचें वर्णन आपण अनेक प्रसंगीं पुराणादि ग्रंथांतून वाचतों. त्याप्रमाणें या ठिकाणींहि देवर्षि नारदांनीं सावित्रीला कांहीं अचुक प्रश्न विचारून तिची परीक्षा केली व पुढील आर्य स्त्रियांस ती सर्वथा अनुकरणीय आहे असें स्पष्ट दाखविलें. सावित्री कोठें गेली होती असा नारदांनीं प्रश्न केल्यावरून अश्वपति राजानें सावित्रीलाच त्याचें उत्तर देण्यास सांगितलें. सावित्री ह्मणाली—

कांहीं काळापूर्वी शाल्व देशामध्यें द्युमत्सेन नामक एक धर्मात्मा राजा राज्य करीत होता. पुढें वृद्धावस्थेमध्यें त्याला अंधत्व आलें; त्याचा पुत्रहि या वेळीं राज्यभार वहाण्यास समर्थ होईल इतका मोठा झालेला नव्हता. ही संधि साधून राजाच्या पूर्वीपासून शत्रु असलेल्या एका शेजारच्या राजानें स्वारी करून द्युमत्सेनाचें राज्य बळकावलें. तेव्हां तो वृद्ध राजा आपल्या भार्येला व लहान पुत्राला बरोबर घेऊन

अरण्यांत जाऊन राहिला. तेथें तपश्चर्येमध्यें तो आपला काळ घालवूं लागला. त्या राजाचा तो सत्यवान् नांवाचा पुत्र आतां मोठा झाला आहे व मला योग्य पति तोच आहे.

हें ऐकून भूत, भविष्य व वर्तमान जाणणारे नारद मुनि ह्मणाले, अरेरे! राजा, गुणसंपन्न सत्यवानाला सावित्रीनें वरण्याचा निश्चय केला खरा, परंतु तिला पुढलें भविष्य ठाऊक नाहीं.

राजा ह्मणाला, मुनिवर्य आपण काय ह्मणतां? तो सत्यवान् तेजस्वी, बुद्धिमान्, क्षमासंपन्न, शूर, पितृभक्त असा आहे ना?

नारदांनीं उत्तर दिलें, होय, आहे. त्यांचीं माता व पिता सत्यप्रिय आहेत; तसाच तोहि सत्यप्रिय व्हावा ह्मणून त्याचें नांव ब्राह्मणांनीं सत्यवान् असें ठेविलें आहे. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी, इंद्राप्रमाणें शौर्य-संपन्न, पृथ्वीप्रमाणें क्षमासंपन्न आणि बृहस्पतीप्रमाणें बुद्धिमान् आहे.

अश्वपतीनें विचारलें, तो राजपुत्र सत्यवान्. उदार व रूप-वान् आहे ना?

नारदांनीं उत्तर केलें, होय आहे. तो ययातीसारखा उदार व अश्विनीकुमारांप्रमाणें रूपवान् आहे. सुखदुःखें समान मानणारा, सौ-म्यस्वभावी, शूर, सत्यनिष्ठ, जितेंद्रिय, विश्वकुटुंबकवृत्ति, मत्सररहित, मर्यादशील, लोकापवादाची चाड असलेला असा आहे. अनेक तपो-वृद्ध व आचारनिष्ठ लोक त्याची प्रशंसा करीत असतात.

सत्यवानाची नारदांनीं केलेली ही प्रशंसा ऐकून अश्वपतीस आनंद झाला. परंतु संवादाच्या आरंभीं नारदांनीं काढलेल्या उद्गारांची त्याला भीति वाटत होती. इतक्या गुणांनीं युक्त असलेल्या सत्यवानामध्यें कांहीं दोष आहेत कीं काय किंवा त्याच्याशीं विवाह केल्यानें पुढें

कांहीं अरिष्ट येणार आहे कीं काय हें राजाच्या बरोबर ध्यानांत येईना. ह्मणून त्यानें पुन्हां नारदांस प्रश्न केला–हे भगवन्, तर मग सत्यवानाचे ठिकाणीं कांहीं अवगुण आहे कीं काय ?

नारदांनीं उत्तर दिलें, सत्यवानामध्यें फक्त एकच दोष आहे. तो हा कीं तो अल्पायुषी आहे. आजपासून बरोबर एक वर्षानें त्याचें आयुष्य संपतें आहे.

हें उत्तर ऐकून अश्वपति चिंतातुर होत्साता सावित्रीला ह्मणाला, बाळ सावित्री, नारदांनीं सांगितलेलें भविष्य तूं ऐकलेंस ? सत्यवानाचे ठिकाणचा हा दोष सर्व गुणांची माती करण्यास समर्थ आहे.

परंतु सावित्रीच्या चेहऱ्यावर यत्किंचित्‌हि फेरबदल झाला नाहीं.

आपल्या पित्याच्या भाषणाचा अभिप्राय जाणून ती ह्मणाली, महाराज, वडिलार्जित धन एकदांच मिळतें; कन्या वराला एकदांच देत असतात; आणि ‘ ही कन्या मी देतों ’ असे शब्द पित्याकडून एकदांच उच्चारले जातात. ह्मणजे या तीन गोष्टी वारंवार होणाऱ्या नव्हेत. ह्मणून आतां

दीर्घायुरथवाल्पायुः सगुणो निर्गुणोऽपि वा ॥
सकृद्वृतो मया भर्ता न द्वितीयं वृणोम्यहम् ॥

पति दीर्घायु असो अथवा अल्पायु असो, गुणांनीं युक्त असो अथवा गुणांनीं रहित असो, तो मीं एकदांच वरला आहे. मी दुसरा वरणार नाहीं. मनुष्य अगोदर मनानें निश्चय करतो, नंतर तो निश्चय वाचेनें उच्चारतो आणि त्यानंतर ती वाचा कृतीमध्यें आणतो. अर्थात् मीं वाचेनें जे शब्द उच्चारले त्यांचा अगोदर मनानें निश्चय झालेला आहे ह्मणून उच्चारले. तेव्हां मनाचा

झालेला निश्चय मीं खोटा करणार नाहीं, तो मला प्रमाण आहे.

या निर्धाराच्या उत्तरानें भगवान् नारद मनांत अत्यंत संतुष्ट होऊन ह्मणाले, हे राजा, सावित्रीचा निश्चय कायम झालेला आहे. तिला आतां परावृत्त करणें शक्य नाहीं. तेव्हां तूं सत्यवानालाच हिचें दान करावेंस हें बरें असें मला देखील वाटतें. सावित्रीचा विवाह निर्विघ्नपणें पार पडो आणि तुह्मां सर्वांचें कल्याण होवो.

नारदांचा हा आशीर्वाद अश्वपतीनें मोठ्या आदरानें मान्य केला. नंतर नारद निघून गेले व इकडे राजानें लवकरच होणाऱ्या विवाहाची तयारी चालविली.

---

## अध्याय तिसरा.

## सावित्रीचा विवाह.

विवाहाचा मुहूर्त जवळच होता. अश्वपति राजानें सर्व साहित्य तयार करवून द्युमत्सेन राजा ज्या तपोवनांत रहात असे त्या तपोवनाकडे वृद्ध ब्राह्मण व पुरोहित यांच्यासहवर्तमान प्रयाण केलें. कारण हा विवाह आपल्या राजधानींत न होतां तपोवनांतच होणें इष्ट आहे असें त्याला व अर्थात् सावित्रीलाहि वाटत होतें. तपोवनाच्या सीमेपर्यंत आल्यानंतर अश्वपति राजा सर्व मंडळीबरोबर पायानें चालत द्युमत्सेनाच्या आश्रमांत येऊन दाखल झाला. तेव्हां एका शालवृक्षाखालीं दर्भासनावर बसलेला तो दृष्टिहीन झालेला द्युमत्सेन राजा त्यांच्या दृष्टीस पडला. अश्वपतीनें आरंभीं द्युमत्सेनाची पूजा करून आपलें नांव कळविलें. तेव्हां द्युमत्सेनानेंहि अर्घ्य, आ-

सन, मधुपर्क इत्यादिकांनीं अतिथींचें योग्य स्वागत केल्यानंतर येण्याच्या उद्देश विचारला. अश्वपतींनें आपल्या येण्याचें कारण सांगितलें. तें ऐकून द्युमत्सेन ह्मणाला—

आह्मी राज्यभ्रष्ट झालों असून सध्यां वनामध्यें वास्तव्य करणार तपस्वी आहों. तेव्हां अशा वनवासास आपली कन्या सर्व प्रकारें अयोग्य आहे. हा क्लेशकारक वनवास ती कसा भोगील?

अश्वपति ह्मणाला—सुख आणि दुःख हीं जशीं उत्पत्ति पावतात तशींच नाशहि पावतात. तेव्हां त्यांचा कांहीं नियम नाहीं. हें सर्व जाणून मी आणि माझी कन्या येथें आलों आहों. त्या अर्थी आपण असें सांगणें योग्य नाहीं. आह्मीं सर्व निश्चय ठरविला आहे; त्या अर्थी आमच्या आशेचा आपण भंग करूं नये. आपण माझ्या बरोबरीचे आहांत व मीहि आपणांला आपल्यासारखाच समजतों. ह्मणून ही माझी कन्या सावित्री आपली स्नुषा व सत्यवानाची भार्या ह्मणून ग्रहण करा.

नंतर द्युमत्सेनानें मान्यता दिल्यावर सर्व आश्रमवासी ब्राह्मणांना तेथें आणविलें व शुभ मुहूर्तावर सत्यवान् आणि सावित्री यांचा विवाह करविला. याप्रमाणें कन्यादान केल्यावर योग्यतेनुरूप लवाजमा देऊन राजा अश्वपति आपल्या राजधानीस गेला. सत्यवान् व सावित्री यांना या विवाहानें अति आनंद झाला.

पिता निघून गेल्यानंतर सावित्रीनें सर्व अलंकार काढून ठेवून वनवासास योग्य अशीं वल्कलें, भगवीं वस्त्रें इत्यादि धारण केलीं. वडिलांची सेवा आणि नम्रपणा या गुणांनीं ती सर्वांस संतुष्ट ठेवूं लागली. सासू, श्वशुर आणि पति यांच्या सेवेंत तिनें कधीं अंतर पडूं

दिलें नाहीं. अर्थातच सावित्री तिघांनाहि अत्यंत आवडूं लागली. अशा प्रकारें त्या तपोवनामध्यें देखील आपण स्वर्गाचें सुख अनुभवीत आहों असें त्यांना वाटे. कारण उघडच आहे, सुख कांहीं ऐषआरामांत नाहीं, द्रव्यामध्यें नाहीं. खरें सुख सद्गुणी माणसांमध्येंच आहे. याप्रमाणें हळुहळु काळ जाऊं लागला.

---

अध्याय चवथा.

## सावित्रीचें व्रताचरण.

सावित्रीला संसारसुख मिळूं लागलें खरें, पण तिच्या पतीच्या आयुष्याचा एकेक दिवस रोज कमी होत आहे हें तिला माहीत होतें. नारदांचें वाक्य तिच्या मनांत एकसारखें घोळत होतें. भवितव्यतेपुढें कोणाचा इलाज नाहीं ही गोष्ट सावित्री जाणून होती. परंतु त्याबरोबर आपण आपलें कर्तव्य केलें पाहिजे हेंहि ती जाणून होती. फळाविषयीं काळजी न करितां प्रत्येकानें आपलें कर्तव्य करणें हें सर्व महाभारताचें सार आहे. कर्तव्याचा उपदेश महाभारतांत आरंभापासून शेवटपर्यंत सर्वत्र ग्रथित झालेला आहे. त्या प्रकारें सावित्री वागत होती.

याप्रमाणें काळ निघून जाऊं लागला. तो कोणाची वाट पहाणार? परमेश्वरानें आंखून दिलेल्या मार्गानें तो सारखा चालतच असावयाचा. या क्रमानें एक वर्ष बहुतेक गेलें. नारदांनीं सांगितलेल्या दिवसाला तीन दिवस कमी राहिले. तेव्हां तिनें त्रिरात्रव्रत करण्याचा निश्चय केला. हें व्रत फार कठिण आहे. तथापि आपल्या

पतीच्या आयुष्याकरितां तें कठिण व्रत आचरण्याचें सावित्रीनें मनावर घेतलें. आजपासून चवथ्या दिवशीं सत्यवानाला मृत्यु येणार असें कळून आल्यावर ती भक्तिसंपन्न स्त्री त्रिरात्रव्रत करण्याच्या उद्देशानें रात्रंदिवस उभी राहिली. सावित्रीनें आचरिलेला ह्या नियम ऐकतांच द्युमत्सेन राजा अत्यंत दुःखित होऊन सावित्रीची समजूत करूं लागला. तीन दिवस उभें रहाणें अत्यंत कठिण आहे असें त्यानें सांगितलें.

सावित्री ह्मणाली—हे तात, आपण याविषयीं काळजी करूं नका. मी हें व्रत तडीस नेईन. कारण हें मीं निश्चयपूर्वक आरंभिलें आहे; आणि निश्चय हेंच कर्म तडीस जाण्याचें कारण आहे.

सावित्रीचें उत्तर ऐकून द्युमत्सेनास एक प्रकारचें समाधान झालें. सावित्रीनें असें खडतर व्रत करूं नये असें जरी त्यास वाटत होतें तरी तिच्या निश्चयाच्या आड तो आला नाहीं. तो ह्मणाला—तूं आपलें व्रत मोड असें मी तुला कोणत्याहि प्रकारें सांगूं शकत नाहीं. कारण तूं तें तडीस ने असेंच मजसारख्यानें सांगणें योग्य आहे.

सावित्रीनें व्रत आरंभिलें. सतत उभी राहिल्यानें सावित्री काष्ठाप्रमाणें दिसूं लागली. दोन दिवस जाऊन तिसरा दिवस उजाडला. आतां पतीच्या आयुष्याचा आणखी एकच दिवस राहिला आहे हें एकसारखें मनांत घोळत राहिल्यामुळें तो दिवस व ती रात्र दुःखामध्येंच निघून गेली. चवथा दिवस उजाडला. तेव्हां व्रताची समाप्ति करण्याकरितां सावित्रीनें दिवसाच्या पूर्वभागीं करावयाच्या सर्व क्रिया करून सूर्य उदयाचलापासून चार हात वर आल्यानंतर प्रदीप्त अशा अग्नीमध्यें होम केला व सर्व वृद्ध ब्राह्मणांना आणि सासूसास-

त्यांना क्रमानें नमस्कार करून व हात जोडून ती विनयानें उभी राहिली. तेव्हां त्या तपोवनांतील सर्व मुनींनीं तिला सौभाग्यसूचक शुभ आशीर्वाद दिले. सावित्रीनें ते सर्व सद्गदित अंतःकरणानें स्वीकारले. याप्रमाणें व्रताची समाप्ति झाल्यावर सासू व सासरा तिला प्रेमानें ह्मणालीं—

तूं सांगितल्याप्रमाणें व्रत तडीस नेलेंस. आतां तुला भोजन करण्याचा समय प्राप्त झाला आहे. याकरितां आतां भोजन कर.

परंतु सावित्रीचें लक्ष पतीच्या जीविताकडे होतें. तिला भोजन कसचें सुचतें ? ती ह्मणाली, सूर्यास्तानंतर माझी कांहीं इष्ट गोष्ट करून नंतर भोजन करण्याचा मीं संकल्प केला आहे.

पुढें थोड्या वेळानें नेहमींच्या क्रमाप्रमाणें सत्यवान् खांद्यावर परशु घेऊन अरण्यांत लांकडें तोडून आणण्यास व फळें गोळा करण्यास निघाला. या दिवशीं आपण क्षणमात्र देखील पतिरहित असूं नये असें सावित्रीचें मन तिला सांगत होतें. ह्मणून ती पतीला म्हणाली, आपण एकटे जाऊं नये. मी बरोबर येतें. सोडून रहाण्याचा आज मला धीर होत नाहीं.

आजची ही चमत्कारिक विनंति ऐकून सत्यवानाला आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, तूं पूर्वीं केव्हांहि वनांत गेली नाहींस; वनाचा मार्ग बिकट आहे; आणि तूं तीन दिवस व्रतासंबंधी उपवास केल्यामुळें क्षीण झालेली आहेस. तेव्हां तुला चालतां तरी कसें येईल ?

सावित्रीनें निश्चयपूर्वक उत्तर दिलें, उपवासानें मी म्लान झालेली नाहीं; मला श्रम झालेले नाहींत; मला बरोबर येण्यास उत्साह वाटत आहे. यास्तव माझा निषेध करूं नये.

सत्यवान् ह्मणाला, माझ्या बरोबर येण्याची तुला हौस असेल तर माझी हरकत नाहीं. पण तूं वडिलांना विचारून ये. कारण मजवर दोष येऊं नये.

पतीचें हें वाक्य ऐकून सावित्रीनें सासूश्वशुरांकडे जाऊन त्यांची वनांत जाण्याकरितां परवानगी मागितली. पतिबरोबर आज बाहेर जाण्याची आपली इच्छा असल्याबद्दल व विवाह झाल्यापासून एक वर्षांत कोठें बाहेर न गेल्यामुळें एकदां वनश्रीचें अवलोकन करण्याची इच्छा झाल्याबद्दल सावित्रीनें त्यांस सांगितलें. आपल्या सच्छील स्नुषेची ही विनंति ऐकून द्युमत्सेन ह्मणाला—

तूं माझी सून झाल्यापासून अद्यापपर्यंत कोणतीहि विनंति केल्याचें मला आठवत नाहीं. ही तुझी पहिलीच विनंति आहे. तेव्हां तुझी इच्छा आहे त्याप्रमाणें कर. मात्र मार्गांत सत्यवानाकडे लक्ष असूं दे. नाहीं तर वाटवाट चुकशील.

याप्रमाणें त्या उभयतांची अनुज्ञा मिळाल्यावर सावित्री वास्तविक दुःखयुक्त होती तरी आनंदयुक्त मुद्रेनें पतीबरोबर वनांत निघाली. अनेक मयूरांनीं युक्त, निर्मल प्रवाहाच्या नद्यांनीं शोभायमान आणि प्रफुल्ल वृक्षांनीं सुशोभित अशी ती वनश्री अवलोकन करीत सावित्री चालली. वनाची शोभा ठिकठिकाणीं सत्यवान् तिला दाखवीत होता. परंतु सावित्रीचें खरें लक्ष पतीकडे होतें. नारदांच्या भाषणाप्रमाणें आपल्या पतीवर आज मृत्यूचा प्रसंग येणार हें जाणून मनांत ईश्वराचा धांवा करीत ती चालली होती.

---

अध्याय पांचवा.

## सावित्रीचा व यमाचा संवाद.



वनांत गेल्यावर सत्यवानानें नेहमींच्या रीतिप्रमाणें फळें गोळा केलीं आणि टोपली भरल्यानंतर तो लांकडें तोडूं लागला. त्याच्या मृत्यूची वेळ जवळ येत चालली होती. लांकडें तोडूं लागतांच त्याच्या अंगास दरदरून घाम आला व श्रमानें त्याच्या मस्तकांत वेदना होऊं लागल्या. तो सावित्रीस ह्मणाला—

या श्रमानें माझ्या मस्तकांत वेदना उत्पन्न झाल्या आहेत; आणि माझे सर्व अवयव म्लान होऊन गेले असून अंतःकरण खिन्न झाल्यासारखें झालें आहे. माझें मन अस्वस्थ झालें असून डोकें दुखत आहे. ह्मणून मला आतां निजावेंसें वाटतें. उभें रहाण्याची माझ्या अंगांत शक्ति नाहीं.

पतीचें हें भाषण ऐकून सावित्रीचें काळीज चर्र झालें. या डोकें दुखण्याचा आणि अस्वस्थतेचा अर्थ काय तो तिला माहीत होता. शांत चित्तानें व धैर्यानें या संकटास तोंड देण्याचा तिचा निश्चय लग्नाच्या वेळेपासूनच झालेला होता. आपल्या मांडीवर मस्तक ठेवून निजण्याविषयीं तिनें पतीला सांगितलें. सत्यवान् तत्काळ झोंपीं गेला. सुमारें दोन घटका अशा स्थितींत गेल्या. सावित्रीचें सर्व लक्ष पतीकडे लागलें असून मनांतल्या मनांत ती ईश्वराचा सतत धांवा करीत होती. समोर तिला एक पुरुष दिसूं लागला. त्यानें आरक्तवर्ण वस्त्र परिधान केलें होतें; मस्तकावर मुकुट धारण केला होता. त्याचें शरीर फार सुंदर असून तेज सूर्यासारखें होतें. शरीराचा वर्ण सांवळा खरा

पण त्यांत गोरेपणाची झांक मारीत होती. हातांत पाश धारण केल्यामुळें तो भयंकर दिसत होता. त्याला पहातांच सावित्रीच्या हृदयास कंप सुटला. परंतु ती सामान्य स्त्री नव्हती. हा यमधर्म आहे असें तिनें ओळखलें. अशा वेळीं घाबरून न जातां धैर्यच धरलें पाहिजे व शांत मनानें सर्व संकटास तोंड दिलें पाहिजे असा जणूं काय तिचा विचार होता. पतीचें मस्तक हळूच खालीं ठेवून ती उठली व दुःखाकुल होत्साती यमधर्मापुढें हात जोडून ह्मणाली—

हे प्रभो, आपण मनुष्यकोटींतील कोणी नसून देव आहां हें मीं ओळखलें आहे. कारण, आपलें हें अमानुष शरीरच तसें सांगत आहे. ह्मणून हे देवाधिदेवा, आपण कोण आहां हें मला सांगा.

यम ह्मणाला—सावित्रि, तूं पतिव्रता असून तपोनिष्ठ आहेस. यामुळेंच मी तुझ्याशीं भाषण करीत आहें. हे साध्वि, मी यम आहें. तुझा पति सत्यवान् याचें आयुष्य संपलें, ह्मणून त्याला घेऊन जाण्याकरितां मी येथें आलों आहें असें जाण.

सावित्री ह्मणाली—हे भगवन्, मृत्युसमयीं मनुष्यांना परलोकीं नेण्यास आपले दूत येत असतात असें आह्मीं ऐकिलें आहे. तर मग आपण स्वतः येथें कसे आलां हें सांगावें अशी माझी विनंति आहे.

हें ऐकून यमधर्म ह्मणाला—सावित्रि, तुझा हा पति सत्यवान् धर्मशील आणि सद्गुणसंपन्न आहे. अशा मनुष्याला नेण्यास माझ्या दूतांनीं येण्यापेक्षां मींच यावें हें मला योग्य दिसलें. याकरितां मी स्वतः येथें आलों आहें.

इतकें बोलून यमानें सत्यवानाच्या शरीरावर आपला फांस टाकला आणि त्यापासून अंगुष्ठमात्र प्रमाणाचें त्याचें सूक्ष्म शरीर बाहेर काढलें.

तेव्हां सत्यवानाचें स्थूल शरीर प्राणरहित झालें. नंतर यम सत्यवानाचें सूक्ष्म शरीर घेऊन दक्षिण दिशेकडे जाऊं लागला. हें पाहून पतिनिष्ठ सावित्रीहि यमाच्या मागोमाग जाऊं लागली. पतीच्या प्राणाबरोबर आपला प्राण द्यावयाचा असा विवाहापासूनच तिचा निश्चय झालेला होता. तेव्हां यम तिला ह्मणाला---

सावित्रि, आतां मागें जा. आपल्या पतीचें और्ध्वदेहिक कर्म कर. तूं पतीचें मनुष्यलोकींचें ऋण फेडलें आहेस. पतीच्या बरोबर जेथवर येणें शक्य आहे तेथवर तूं आली आहेस.

सावित्रीनें उत्तर दिलें--

**यम मे नीयते भर्ता स्वयं वा यत्र गच्छति ।**
**मयापि तत्र गन्तव्यमेष धर्मः सनातनः ॥**

माझ्या पतीला जिकडे नेलें जाईल अथवा तो स्वखुषीनें जिकडे जाईल तिकडे मींहि गेलें पाहिजे असा सनातन धर्म आहे. तपश्चर्या, गुरुभक्ति, पतिनिष्ठा, व्रत आणि आपला अनुग्रह यांचे बळावर मी आपल्याबरोबर येऊं लागलें तर माझी गति कुंठित होणार नाहीं. केवळ सात पावलें आपण ज्याच्या बरोबर चाललों तो देखील आपला मित्र होय असें धर्मशास्त्र सांगतें. येथें आपण माझे मित्र झालांत हें उघड आहे. तेव्हां आतां या मैत्रीच्या अनुरोधानें मी कांहीं सांगतें तें ऐका. आश्रमधर्माचें आचरण हें आत्मज्ञानाला साधन आहे असें ज्ञानी लोकांनीं सांगितलें आहे. ह्मणून प्रत्येकानें आपणांस उचित अशा आश्रमधर्माचें आचरण करणें सज्जनांस मान्य आहे. आपल्या आश्रमधर्माचें आचरण करतेवेळीं इतर आश्रमधर्मांची इच्छाहि करूं नये. यास्तव माझ्या पतीला नेऊन माझ्या गार्हस्थ्यधर्माचा विध्वंस

करणें आपणास उचित नाहीं.

सावित्रीचें हें विचारयुक्त भाषण ऐकून यम म्हणाला—सावित्रि, तुझ्या भाषणानें मी संतुष्ट झालों आहें. यास्तव तुला इष्ट पण सत्यवानाच्या जीविताखेरीज असा कोणताहि वर तूं माग; मी तो देईन; आणि मग परत जा.

सावित्री ह्मणाली—महाराज, इतर वर मागण्याच्या हेतूनें मीं भाषण केलें नाहीं. तथापि आपण वर मागण्यास ज्या अर्थी सांगत आहां, त्या अर्थी आपल्या प्रसादाच्या योगानें माझ्या श्वशुरास दृष्टि प्राप्त होऊन तो तेजस्वी होवो असा वर मी मागतें.

यमधर्मानें हा वर दिला व तुला फार श्रम झाले आहेत, तूं परत जा असें सांगितलें. परत न जातां सावित्री ह्मणाली—

श्रमः कुतो भर्तृसमीपतो हि मे
यतो हि भर्ता मम सा गतिर्ध्रुवा ।
यतः पतिं नेष्यसि तत्र मे गतिः
सुरेश भूयश्च वचो निबोध मे ॥

पतीच्या सान्निध्यामध्यें असतांना मला श्रम कोठून होणार ? जिकडे पति तिकडेच मीं गेलें पाहिजे हें निश्चित आहे. ज्या अर्थी आपण माझ्या पतीला नेत आहां, त्या अर्थी माझीहि गति तिकडेच आहें. हे देवाधिदेवा, माझें भाषण आपण श्रवण करा. सज्जनांचा समागम कधीं निष्फळ होत नाहीं. अर्थात् आपल्या सोबतीनें मी आलें तर तें चांगलेंच आहे.

यम ह्मणाला—हे पतिव्रते सावित्रि. तुझें भाषण फार गोड आहे. मी पुन्हां तुझ्या या भाषणानें संतुष्ट होऊन तुला आणखी वर देत

आहे. याकरितां सत्यवानाच्या जीविताखेरीज तुला कोणता पाहिजे तो वर आणखी एकदां मागून घे.

सावित्री ह्मणाली–हे प्रभो, मला पतीच्या जीवितावांचून दुसऱ्या वराची अपेक्षा नाहीं. तथापि आपल्या ह्मणण्यास मान देण्याकरितां मी दुसरा वर मागून घेतें. शत्रूंनीं हरण केलेलें राज्य माझ्या श्वशुरास आपल्या प्रसादानें पुन्हां प्राप्त व्हावें.

यम ह्मणाला–तुझ्या श्वशुरास पुन्हां राज्य प्राप्त होईल. हे पतिव्रते, हा तुझा मनोरथ मीं पूर्ण केला आहे. आतां परत फीर.

पण सावित्री परत कशी फिरणार? यमलोकीं असो अथवा मृत्युलोकीं असो, सत्यवानाच्या बरोबर जाणार या निश्चयानें ती चालली होती. सावित्री पुन्हां ह्मणाली—

हे देवा, आपण सर्व प्रजांचें धर्मानें नियमन करतां ह्मणून आपणांस यम असें ह्मणतात. कोणत्याहि प्राण्याचा क्रियेनें, वाणीनें अथवा मनानें द्रोह न करणें व सर्वांवर अनुग्रह करणें याला सज्जन धर्म असें ह्मणतात. सामान्य मनुष्य देखील कोणास पीडा देत नाहींत, त्यांतून सज्जन असतात ते तर शत्रूवरहि दया करतात.

यम ह्मणाला–हे कल्याणि, तुझें भाषण मला अमृताप्रमाणें तृप्तिकारक वाटतें. मी तुला प्रसन्न झालों आहें. सत्यवानाचें जीवित खेरीजकरून तुला इष्ट असा आणखी एक वर माग. मी देण्यास तयार आहें.

सावित्री ह्मणाली—देवाधिदेवा, पतीच्या अभावीं मला वर कशास पाहिजे? तथापि आपल्या ह्मणण्याचा अनादर होऊं नये, यास्तव 'माझ्या पित्याला पुत्र व्हावे' असा वर मी मागतें.

यमानें उत्तर केलें—माझ्या वराप्रमाणें तुझ्या पित्याला अत्यंत

तेजस्वी आणि कुलाची वृद्धि करणारे शंभर पुत्र होतील. सावित्रि, आतां माझ्या मागें येऊं नको. तूं फार दूरवर आली आहेस.

सावित्री ह्मणाली—पतीचें सान्निध्य असलें ह्मणजे मला कोणचेंहि ठिकाण दूर नाहीं. हे धर्मराजा, आपण सर्व प्रजेला धर्म दाखवून दिलेला आहे, ह्मणून आपणांस धर्मराज ह्मणतात. धर्मबुद्धि सज्जनांवर मनुष्यांचा अत्यंत विश्वास असतो.

यम ह्मणाला—सावित्रि, तुझ्या भाषणानें मला संतोष होत आहे. पण हें ठिकाण तुझें भाषण ऐकण्याचें नव्हे. मी तुझ्यावर संतुष्ट होऊन तुला सत्यवानाच्या जीविताखेरीज आणखी एक वर देतों. तो मागून घे आणि परत जा.

सावित्री आतां स्पष्टच ह्मणाली—हे धर्मराजा, मजपासून सत्यवानास वीर्यशाली व कुलदीपक असे शंभर औरस पुत्र व्हावे हा चवथा वर मी आपणांपासून मागून घेतें.

यम ह्मणाला—बरें आहे. माझ्या वरानें तुझी इच्छा तृप्त होईल. पण तूं आतां मागें फीर. यमाचें लक्ष आपण काय बोलतों याकडे नसून सावित्री मागें कशी फिरते इकडे होतें. सावित्रीनें हा यमावर जयच मिळविला ह्मणावयाचा.

सावित्रीला आतां धीर आला. ती ह्मणाली—हे दयानिधे धर्मराजा, सज्जनांचा समागम केव्हांहि निष्फळ होत नाहीं. याचा आज मला प्रत्यक्षच अनुभव आला. सज्जन प्रत्युपकाराची अपेक्षा न करितां दुसऱ्यावर उपकार करीत असतात.

यम ह्मणाला—सावित्रि, तुझ्यावर माझी उत्कृष्ट प्रकारची भक्ति बसत आहे. मी तुला खरोखरी प्रसन्न झालों आहें. तुला इष्ट अस

कोणताहि वर मजपासून मागून घे.

सावित्री ह्मणाली—देवा, "सत्यवानाच्या जीविताखेरीज" असे शब्द आपल्या या वाक्यामध्यें नाहींत. खरें ह्मटलें तर मागच्याच वरामध्यें माझ्या पतीचें जीवित आपण मला परत दिलें आहे. तेव्हां मीं आणखी वर तो काय मागावयाचा?

वरं वृणे जीवतु सत्यवानयं ।
यथा मृता ह्येवमहं पतिं विना ॥

माझा पति जिवंत होऊं दे असा वर मी मागून घेतें. कारण पति जिवंत नसेल तर मी मेल्यासारखीच आहें.

न कामये भर्तृविनाकृता सुखं ।
न कामये भर्तृविनाकृता दिवम् ॥
न कामये भर्तृविनाकृता श्रियं ।
न भर्तृहीना व्यवसामि जीवितुम् ॥

पतीच्या सन्निध मी नसेन तर मला सुखाची इच्छा नाहीं, स्वर्गाची इच्छा नाहीं, संपत्तीची इच्छा नाहीं; पतिविरहित जगण्यास देखील मी असमर्थ आहें. मला शंभर पुत्र होतील असा वर आपणच दिला आणि त्यानंतर माझ्या पतीला घेऊन आपण चालला; तर माझा पति सत्यवान् जिवंत होवो असा वर मी मागतें. ह्मणजे तुमचेच शब्द खरे होतील.

हें ऐकून यमानें आपला पाश टाकला. सावित्रीच्या भाषणानें आनंदित होत्साता तो ह्मणाला, हे स्वकुलानंदकारिणी, कल्याणी सावित्रि, हा तुझा पति मीं सोडून दिला आहे. आतां हा रोगरहित, तुझें पोषण करणारा व तुझे मनोरथ पूर्ण करणारा असा होईल. त्याचें

आयुष्य चारशें वर्षं होऊन त्याला तुझ्या साहाय्यानें धर्मप्राप्ति होईल. तुला शंभर पुत्र होऊन ते सर्वहि पुत्रपौत्रादिकांनीं युक्त होत्साते इहलोकीं कीर्तिरूपानें अक्षय होऊन रहातील. तुझी माता मालवी व पिता अश्वपति यांनाहि शंभर पुत्र होतील.

याप्रमाणें वर दिल्यानंतर तो धर्मराज यम सावित्रीला परत पाठवून आपल्या मंदिराकडे निघून गेला. नंतर सावित्री ज्या ठिकाणीं पतीचें शरीर पडलें होतें त्या ठिकाणीं आली व पतीचें मस्तक पुन्हां आपल्या मांडीवर घेऊन भूमीवर बसली. इतक्यांत तो झोंपेंतून जागा झाल्याप्रमाणें पुनरपि जिवंत होऊन सावित्रीकडे पाहून बोलूं लागला—

मी पुष्कळ वेळ निजलों. मला कां बरें उठविलें नाहींस? मला ज्यानें ओढून नेलें होतें तो श्यामवर्ण पुरुष कोठें आहे?

सावित्री ह्मणाली—आपण बराच वेळ निजलां. प्रजांचें संयमन करणारा तो भगवान् यम निघून गेला. आतां उठावें. रात्र पडूं लागली आहे. येथें काय वृत्तांत घडला तो मी उद्यां निवेदन करीन. आपल्या पित्याचें दर्शन घेण्यास चलावें.

नंतर सत्यवान् आणि सावित्री परत आश्रमाकडे येण्यास निघालीं. या दिवशीं सत्यवानास घरीं परत येण्यास फार उशीर झाला होता. आपल्या चिंतेनें मातापितरांची अवस्था काय झाली असेल याबद्दलचे विचार मनांत येऊन सत्यवान् अश्रु गाळूं लागला. शोकाकुल पतीची ती अवस्था अवलोकन करून सावित्री ह्मणाली, जर मीं कांहीं तप केलें असेल, दान केलें असेल, अथवा हवन केलें असेल, तर माझ्या सासूसासऱ्यांना, पतीला व मला ही रात्र सुखकारक होवो. मीं केव्हांहि असत्य भाषण केल्याचें मला स्मरत नाहीं, ह्मणून त्या प्रभावानें माझे

सासूसासरे जिवंत राहोत. नंतर सत्यवान् व सावित्री त्वरेनें आश्रमाकडे आलीं.

---

अध्याय सहावा.

## उपसंहार.

आपला पुत्र सत्यवान् व स्नुषा सावित्री यांना वनांत जाऊन फार वेळ झाला ह्मणून द्युमत्सेन व त्याची भार्या हीं अत्यंत चिंताक्रांत झालीं होतीं. तीं सद्गुणी पुत्राकरितां व सुशील स्नुषेकरितां शोक करूं लागलीं होतीं. आश्रमांतील तपोनिधि सुवर्चा, गौतम, भारद्वाज, दाल्भ्य इत्यादि ऋषींनीं अंतर्ज्ञानानें व तपोबलानें सत्यवान् व सावित्री जिवंत आहेत असें खात्रीपूर्वक सांगितलें. पुढें दोन घटिकांनीं सत्यवान् व सावित्री आश्रमांत आलीं. त्याबरोबर अंध द्युमत्सेनाला दृष्टि प्राप्त होऊन त्यानें त्या दोघांना डोळे भरून पाहिलें. नंतर ऋषींनीं विचारल्यावरून सावित्रीनें वनांत घडलेली हकीकत इत्थंभूत निवेदन केली. ती ऐकून सर्व मंडळी आनंदसागरांत पोहूं लागली व सावित्रीस धन्यवाद देऊं लागली. दुसरे दिवशीं द्युमत्सेन राजाचे मंत्री आले. अमात्यानें शत्रूला ठार करून राज्य परत मिळविल्याचें वृत्त त्यांनीं राजाला निवेदन केलें. पुन्हां राज्यपदावर आरूढ होण्यासाठीं त्यांनीं राणी, राजपुत्र सत्यवान् व सावित्री यांसह द्युमत्सेनाला नेलें. नगरांत गेल्यावर त्याला राज्याभिषेक करून त्याची पुन्हां गादीवर स्थापना केली. इकडे सावित्रीचा पिता अश्वपति यालाहि कालान्तरानें शंभर पुत्र झाले व सर्वत्र आनंदीआनंद झाला.

---

## सावित्रीचरित्राचें रहस्य.

पांडव बारा वर्षांचा वनवास भोगीत असतां त्यांच्या निरुत्साही मनाला उत्साही करण्याकरितां अनेक प्राचीन सदाचरणी आर्य स्त्रीपुरुषांच्या कथा त्यांना निरनिराळ्या ऋषींनीं कथन केल्या. त्यांपैकींच सावित्रीचें चरित्र हें एक असून तें मार्कंडेय ऋषींनीं पांडवांना सांगितलें. स्वत:वर दु:खमय प्रसंग आल्यामुळें मनुष्य जेव्हां हतबल होतो तेव्हां त्याला धैर्य देण्यासाठीं आपल्या देशांतील पूर्वजांच्या प्राचीन कथा उपयोगीं पडत असतात, असें महाभारतकालीन् ऋषींनीं सिद्ध करून दाखविलें आहे.

सावित्रीचें चरित्र पांडवांच्या अगोदरचें आहे. सावित्रीला होऊन गेल्याला शेकडों हजारों वर्षे झालीं असतील. परंतु अद्यापपर्यंत आपल्या भरतखंडांत—आपल्या आर्यभूमींत—सावित्रीच्या यशाचा दुंदुभि गाजत आहे. सावित्री अद्याप आपल्या देशांत कीर्तिरूपानें जिवंत आहे व ती यापुढेंहि शेंकडों वर्षे राहील असें ह्मणण्यास हरकत नाहीं. सावित्रीचें चरित्रच इतकें उदात्त आहे, इतक्या अमूल्य गुणांचें शिक्षण देणारें आहे, कीं त्याचा ठसा ज्या स्त्रीपुरुषांच्या मनावर प्रतिबिंबित होईल त्यांचें चरित्रहि सद्गुणांनीं भरलेलें व अर्थात् अनुकरणीय असेंच झालें पाहिजे. आह्मांला तर वाटतें कीं, सर्व प्राचीन आर्यस्त्रियांमध्यें सावित्रीइतकी लोकप्रिय स्त्री दुसरी कोणतीहि नाहीं. तिच्या चरित्रांत इतकी जादू भरलेली आहे कीं, सावित्री हें केवळ नांव ऐकल्याबरोबर प्रत्येक आर्य स्त्रीचें व पुरुषाचें अंत:करण या मर्त्यलोकींच्या रूक्ष व विकारशून्य प्रदेशामधून निघून कांहीं वेळ

तरी सद्गुणपरिपूरित अशा उच्च वातावरणांत संचार करूं लागतें.

इतकें अद्भुत सावित्रीच्या चरित्रांत काय आहे बरें? अर्थात् सावित्रीचें पातिव्रत्य. कोणची आर्यस्त्री पातिव्रत्याहून इतर कशाला अधिक लेखीत असेल? पातिव्रत्य हा आर्यस्त्रियांचा धर्म आहे, आर्य स्त्रिया पतिव्रत्याकरितां जगतात, पातिव्रत्यरक्षणार्थ आर्य स्त्रियांनीं आपल्या प्राणांच्या आहुति दिल्या आहेत, पातिव्रत्यरक्षणार्थ आर्यस्त्रियांनीं आपल्या पतीसमवेत जळत्या आगींत उड्या घेतल्या आहेत. सारांश पातिव्रत्य हें आर्यस्त्रियांचें सर्वस्व आहे. पतीचें व्रत, पतीची निष्ठा तें पातिव्रत्य.

न कामये भर्तृविनाकृता सुखं
न कामये भर्तृविनाकृता दिवम् ।
न कामये भर्तृविनाकृता श्रियं
न भर्तृहीना व्यवसामि जीवितुम् ॥

हे सावित्रीचे प्रत्यक्ष यमराजासमोर उच्चारलेले शब्द पतीवांचून स्त्रीला सुख नको, स्वर्ग नको, वैभव नको. पति हेंच स्त्रियांचें सुख, हाच स्वर्ग, हेंच वैभव. पतीला घेऊन यम चालला असतां सावित्री त्याचे मागोमाग जाऊं लागली. जी वाट पतीची तीच आपली. पतीला जर सुख असेल तरच त्या सुखाचा वांटा पत्नीनें घ्यावयाचा. त्याचप्रमाणें पतीला दुःख असेल तर त्या दुःखामध्येंहि पत्नीनें वांटेकरी व्हावयाचें. सारांश, विवाह झाला कीं, जगामध्यें दोन व्यक्तींची एक व्यक्ति झाली असें समजावयाचें. पत्नी व पति यांमध्यें बिलकुल भेदभाव उरावयाचा नाहीं. याचें नांव पतिनिष्ठा, याचें नांव पातिव्रत्य. अशा स्त्रिया ज्या देशामध्यें झालेल्या आहेत तो देश धन्य होय.

अशा स्त्रिया ज्या देशामध्यें आहेत, ज्या कुटुंबांमध्यें आहेत, तो देश अथवा तीं कुटुंबें कधींहि अवनत स्थितींत आहेत असें ह्मणतां येणार नाहीं. स्त्रियांचे सद्गुण त्यांच्या संततीमध्यें यावयाचेच, अर्थात् देशांतील स्त्रिया सद्गुणी असल्या ह्मणजे देश सद्गुणी आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

सावित्रीनें मनानें पति वरल्यानंतर तो अल्पायु आहे असें कळल्यावर नारदांस जें उत्तर दिलें तेंहि खऱ्या पतिव्रतेस शोभण्यासारखेंच आहे. एकदां वरला तो पति; तो दीर्घायु असो अथवा अल्पायु असो. या नियमाप्रमाणें आमच्या आर्य स्त्रियांचें जोंपर्यंत आचरण आहे तोंपर्यंत आह्मांला खरें कुटुंबसौख्य मिळाल्यावांचून रहावयाचें नाहीं. आजकाल जगावरील कोणत्याहि इतर देशापेक्षां आमच्याच देशामध्यें कौटुंबिक सुख पुष्कळ पटीनें अधिक असलेलें प्रत्यक्ष दृष्टीस पडतें त्याचें कारण हेंच होय.

या चरित्रामध्यें अश्वपतीनें नारदांला विचारलेल्या प्रश्नांतहि एक मोठें तत्त्व प्रतिबिंबित झालेलें आहे. अश्वपतीनें सत्यवानाच्या अंगीं अमुक अमुक गुण आहेतना असे नारदांना प्रश्न केले. परंतु त्यांत कोठेंहि " सत्यवान् कुबेरासारखा श्रीमंत आहे कीं नाहीं ? " असा प्रश्न केलेला नाहीं. भावी जामात गुणसंपन्न आहे एवढेंच अश्वपतीला पाहिजे होतें. संपत्तीकडे त्याचें लक्ष नव्हतें. संपत्ति क्षणिक आहे, पण गुण शाश्वत आहेत; संपत्ति परलोकीं येत नाहीं; पण सद्गुणच मनुष्याला परलोकीं सद्गति देतात. सावित्रीनेंहि दुर्गुणी श्रीमंत पति पसंत न करितां दरिद्री पण गुणसंपन्न सत्यवानालाच पसंत केलें. यावरून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. नवरा श्रीमंत असून जर दुर्गुणी

असेल तर त्यापासून कुटुंबसुख लाभणार नाहीं. तें गुणावरच अवलंबून आहे.

अशा प्रकारें सावित्रीचरित्राचें रहस्य आह्मीं येथें थोडक्यांत दाखविलें आहे. सावित्रीची पूजा आपल्या स्त्रिया दरवर्षी करीत असतात. अशा प्रसंगीं हें चरित्र नीट वाचून समजून घ्यावें अशी सर्व महाराष्ट्रीय स्त्रियांना अत्यंत कळकळीची विनंति आहे.

---

## श्रीधरकृत सावित्रीआख्यान.

श्रीगणेशाय नमः । लोमश ह्मणे सावधान । ऐक इतिहास पावन । स्त्रियांहीं ऐकतां सौभाग्यवर्धन । परम कल्याण पुरुषांसी ॥ १ ॥ मद्रदेशींचा नृपति । नाम ज्याचें अश्वपति । वेदविहित चाले नीतीं ॥ उदार धर्मात्मा सर्वज्ञ ॥ २ ॥ त्यास नसे पुत्रसंतान । ह्मणोनि बहुत वर्षें तप करून । सावित्रीचें आराधन । करिता जाहला तो साक्षेपें ॥ ३ ॥ करी दहा लक्ष जप पूर्ण । लक्षसंख्या प्रत्यहीं हवन । पलमात्र दुग्धप्राशन । दहा दिवसांत एकदां करी ॥ ४ ॥ यावरी अष्टादश वर्षें भरलीं । सावित्री देवी प्रसन्न जाहली । अश्वपति ह्मणे ते वेळीं । पुत्रसंतान मज द्यावें ॥ ५ ॥ देवी ह्मणे पुत्रसंतान । तुझे अदृष्टीं नसे जाण । परी लावण्यखाणी दिव्यरत्न । कन्या एक होईल तुज ॥ ६ ॥ भूमंडळीं विख्यात होईल । त्रिभुवनीं महिमा वाढेल । पतिव्रताशिरोमणी सुशील । कीर्ति वर्णितील पुराणीं ॥ ७ ॥ ऐसें बोलून अर्कनंदिनी । गुप्त जाहली तेच क्षणीं । हर्ष खेद दोन्ही पावोनी । राव आला स्वनगरा ॥ ८ ॥ नवमास भरतां पूर्ण । पट्टराणी गुणनिधान । तिचे पोटीं दिव्य रत्न । कन्या सुगुण जाहली ॥ ९ ॥ ते साक्षात् सूर्यपुत्री । नाम ठेविलें सावित्री । उमा रमा

निर्जरेंद्रनारी । उपमे सरी त्यांचीच ॥ १० ॥ तिचें स्वरूप तेजःपुंज । देखोन नाचे शफरीध्वज । कीं लावण्यामृताची सहज । निम्नगा भरून चालिली ॥ ११ ॥ बहुत वर्णिल्या नितंबिनी । मयजा सुलोचना नैषधराणी । परी अश्वपतीची नंदिनी । सावित्री श्रेष्ठ सर्वांत ॥ १२ ॥ मृगशावाक्षी सुहास्यवदनी । विद्रुमाधरी द्विज हिरेखाणी । पिकस्वरी ताटंककर्णी । मित्रमृगांकांसमान ॥ १३ ॥ हरिमध्या हंसगमनी । अंगसुवास न माये सदनीं । सरलघ्राणी मुक्तासुपाणी । भुजंगवेणी कोमलांगी ॥१४॥ चातुर्यसरोवरमराळी ॥ परम सुकुमार शृंगारवल्ली । दिवसेंदिवस थोर जाहली । ते वल्हाळी गुणालया ॥ १५ ॥ कन्या अवतरतां परम । वृद्धिंगत होत ऐश्वर्यद्रुम । सावित्रीऐसें ललाम । राव लाधला परम तपें ॥ १६ ॥ तिजयोग्य वर न दिसे क्षितीं । मग तो नृप ह्मणे कन्येप्रती । तूं पुरुषरत्न शोधून निश्चिती । वर वरीं मानेल तो ॥ १७ ॥ सवें दळभार घेऊनी । कन्या बैसली दिव्ययानीं । छप्पन्न देश स्वनयनीं पहातसे राजबाळा ॥ १८ ॥ तों द्युमत्सेन राजेश्वर । सत्यवान् त्याचा कुमार । तो ईश्वराचा अंश साचार । तिणें वर नेमिला ॥ १९ ॥ ग्रामास आली परतोन । सांगे बापास वर्तमान । राव संतोषला ऐकोन । तों नारदमुनी पातला ॥ २० ॥ रायें बैसवून उत्तमासनीं । मुक्ताभिषेक केला ते क्षणीं । पूजासंभार समर्पूनी । सांगे वर्तमान कन्येचें ॥ २१ ॥ मग नारद बोले वचन । सत्यवान्पिता द्युमत्सेन । त्याचे नयन गेले जाण । दायादीं हिरोन राज्य घेतलें ॥ २२ ॥ दारिद्यदुःखें व्यापूनी । भार्यापुत्र संगें घेऊनी ॥ द्युमत्सेन हिंडे वनीं । आपदा नयनीं पहावेना ॥ २३ ॥ कंदमूळें सेवून । वृक्षातळीं करिती शयन । पिता ह्मणे दुजा वर पाहून । लावण्यगंगा हे द्यावी ॥ २४ ॥ येरी ह्मणे प्राण जावो निर्धार । मनें वरिला तो न सांडीं

भ्रतार । प्रत्यक्ष घडतो व्यभिचार । पतिव्रताधर्म बुडे ॥ २५ ॥ सत्यवानावांचून । वडील समवय लहान । पिता बंधु कीं नंदन । पुरुषमात्र सर्व मातें ॥ २६ ॥ शुद्धकृष्णपक्ष निश्चित । तैसें दारिद्र्य-ऐश्वर्य येत जात । भाग्याभ्र काळीं वितळत । परि निश्चयध्रुव न ढळे पैं ॥ २७ ॥ नारद ह्मणे तुझा नेम सत्य । परि तेथें आहे अनर्थ । एक संवत्सर भरतां मृत्य । सत्यवाना असे हो ॥ २८ ॥ तो मरण पावलियावरी । तूं काय करशील राजकुमारी । येरी ह्मणे निर्धारीं । प्राण देईन त्यासवें ॥ २९ ॥ सुकृत पदरीं असेल निश्चय । तरी विष तेंचि अमृत होय । मृत्तिका जेथें स्वर्णों जाय । तेथें निधान लागेल ॥ ३० ॥ हातीं धरितां पाषाण । तो परीस होय करी सुवर्ण । घरच्या दासी सिद्धि होऊन । कल्पिलें मात्र पुरविती ॥ ३१ ॥ कृपा करील कमलदलाक्ष । तरी अंगणींचे तरु होतील कल्पवृक्ष । शत्रु ते मित्र होती प्रत्यक्ष । पूजा करून वंदिती ॥ ३२ ॥ क्षण न लागतां निर्धारें । तृणगृहें होतील सुवर्णमंदिरें । नृप येऊन गृह आदरें । राखतील सर्वस्वें ॥ ३३ ॥ नारद ह्मणे धन्य धन्य । माझें तुज आशीर्वचन । तुझेही मनोरथ पूर्ण । मद्वरें होतील पैं ॥ ३४ ॥ यावरी विष्णुनाभनंदन । तत्काल पावला अंतर्धान । अश्वपति कन्या घेऊन । तया वनाप्रति पातला ॥ ३५ ॥ त्याच्या आपदा देखून डोळां । अश्वपति सद्गद जाहला । द्युमत्सेन ह्मणे या अंधाला । मावळला भाग्यसूर्य ॥ ३६ ॥ आह्मांस अवदशा संपूर्ण । तुझें न बैसे कदा मन । हे कन्या सुलक्षण । देई नेऊन आणिका वरा ॥ ३७ ॥ राव ह्मणे कन्येचा निर्धार । वरुणदिशेस उगवेल मित्र । हेंहि घडेल परि मी वर । दुसरा न वरीं निर्धारें ॥ ३८ ॥ मग पाहूनियां सुदिन । रायें लावविलें तेथें लग्न । चार दिवस संपादून । दिधलें आंदण बहुतचि ॥ ३९ ॥ कन्या ठेवून त्यापाशीं । अश्वपति गेला स्वनगरासी । सावित्री भ्रतारसेवेसी । दिवसनिशीं सादर ॥ ४० ॥ सासू सासरा

भ्रतार । यांचे सेवेसि परम तत्पर । हेंच तप खडतर । आचरे तेव्हां सावित्री ॥ ४१ ॥ स्त्रियांस साधन हेंच थोर । आपुला पति तोच ईश्वर । सेवा करावी सादर । दुजा विचार नसावा ॥ ४२ ॥ सकळांचे अन्याय सोसून । दासदासींचें राखी मन । अवघीं निजल्या करी शयन । सर्वांआधीं जागी होय ॥ ४३ ॥ चार प्रहर रात्र स्वयें ॥ तळहातीं भ्रताराचे पाय । पतीनें आग्रह करितां पाहें । निद्रा करीत क्षणभरीं ॥ ४४ ॥ दरिद्री हो वृद्ध भ्रतार । दीर्घरोगी दुःखें जर्जर । द्रव्य न जोडी क्रूर । परि न कंटाळे पतिव्रता ॥ ४५ ॥ सेवा करी घडोघडीं । ह्मणे जितकी पडे तितकी थोडी । शरीरपोषणीं आवडी । सर्वही सोडी सती ते ॥ ४६ ॥ पिता वृद्ध दरिद्री भ्रतार । अक्षीर गाय अनाथप्रेतसंस्कार । अंध पांगूळ मुके बधिर । यांसि पाळितां हरि तुष्टे ॥ ४७ ॥ व्यथाभूत गुरूचें सेवन । दरिद्री ब्राह्मणाचें कुटुंबपालन । दरिद्रियाचें करितां लग्न । हरि तुष्टे त्यावरी ॥ ४८ ॥ असो ते पतिव्रता नारी । भ्रताराआधीं भोजन न करी । षड्रस उत्तम फळें निर्धारीं । न भक्षींच पतीविणें ॥४९॥ ग्रामासि जातां भ्रतार । न सेवी उत्तम वस्त्रालंकार । दर्पण न पाहे अहोरात्र । चिंता मानसीं पतीची ॥५०॥ दुर्जनांचा संग न धरी । परवस्त्र न नेसे निर्धारीं । न्याहाळून क्षणभरी । परपुरुषा न पाहे ॥ ५१ ॥ एकांत जरी निःसंग । पडदणीवीण न धुई अंग । परम पुरुषार्थीं अभंग । पतीच आपुला भावित ॥ ५२ ॥ परघरीं निद्रा न करी । एकली मार्ग न चाले क्षणभरी । क्रीडासमयींच विनोद करी । पतीचें मन पाहूनी ॥ ५३ ॥ गुणसरिता ते परम चतुर । निजमनें मोहित प्राणेश्वर । पतिकार्यो दक्ष गुणगंभीर । साध्यसाधनभाव जाणे ॥५४॥ दूर गेल्या प्राणनाथ । सर्व भोगांचें धरी व्रत । पांच दिवसपर्यंत । रजस्वला दृष्टी न पडे ॥ ५५ ॥ भ्रताराची प्रीती जे ठायीं । तिचा स्नेह तिकडेचि पाहीं । पतिद्वेषी सहसाही । त्यातें प्रीति करीना ॥५६॥

दुर्जन येऊं नेदी घरा । आपण न जाई त्यांच्या मंदिरा । संगें नसतां भ्रतारा । विवाहयात्रे नव जाय ॥ ५७ ॥ पतीचे अवगुण लपवित । कीर्ति सद्गुण वर्णित । पतीचें आयुष्य वित्त । कळों नेदी कोणातें ॥ ५८ ॥ भ्रतारास प्रिय निर्धारी । त्या त्या गोष्टींचा साक्षेप करी । अंतर्बाह्य अहोरात्रीं । तिरस्कार नसे तीतें ॥ ५९ ॥ पतीच्या मनांतील सर्व जाणे । स्वामिवर रुसों कधीं नेणें । भ्रतार मारितां हंसतचि ह्मणे । कर तुमचे दुखती पैं ॥ ६० ॥ न घेतां भ्राताराची आज्ञा । कोणएक व्रत नेम करीना । आचरे ती आयुष्यवर्धना पतीचें व्हावया निर्धारें ॥ ६१ ॥ भ्रतार दूर गेलिया जाण । त्यास प्रिय न भक्षी आपण । नानाशास्त्रभोगभूषण । सतीस न गमे कदाही ॥ ६२ ॥ धनधान्य वस्त्रालंकार । भ्रतारास न वंची अणुमात्र । असून नाहीं ह्मणणें निर्धार । प्राणांतींही घडेना ॥ ६३ ॥ कांहीं एक संकटव्यथा । कदा न घाली प्राणनाथा । पति आनंदरूप असतां । आपण सुख मानितसे ॥ ६४ ॥ भ्रतारा होय व्यथा भारी । अन्न न घे उपवास करी । नानावस्तू निर्धारीं । मन त्यांवरी नसे तिचें ॥ ६५ ॥ भ्रताराचें स्वरूप लिहून । दूर गेलिया पाहे विलोकून । अन्न न घे तीर्थाविण । पादुकापूजन हृदयीं करी ॥ ६६ ॥ ऐशी उत्तम गुणखाणी । पतीचा वेध लावी मनीं । जागृतीं सुषुप्तीं स्वप्नीं । न वंची कांहीं तयातें ॥ ६७ ॥ जाईल तरी जावो प्राण । परि पतीचें न बोले न्यून । जन्मोजन्मीं हाच हो ह्मणोन । सर्व देवां नमस्कारी ॥ ६८ ॥ भ्रतारास नकळत । कांहीं एक न ठेवी वस्त । ब्रह्मा विष्णु उमाकांत ॥ स्वरूप भावी पतीचें ॥ ६९ ॥ पतीचें मन रंजे जेणें । तेंच बोले कौतुकवचनें । मनीं ह्मणे अहेवपणें । मी जाईन याआधीं ॥ ७० ॥ पूर्वतपाच्या राशि पूर्ण । तरी ऐशी पावे सुलक्षण । तीस इहलोकीं मान । परत्रीं धन्य ह्मणवित ॥ ७१ ॥ स्वर्गींच्या सर्व पतिव्रता । तीस सामोऱ्या येती तत्वतां । ओवाळून आरत्या ।

दिव्य पुष्पवृष्टि करिती ॥७२॥ या सद्गुणें मंडित पूर्ण । सावित्री देवी गुणनिधान । परि नारद गेला सांगोन । तो दिवस जवळी आला ॥ ७३ ॥ मरणाचे दिवस चारी । उरले ते कळलें सुंदरी । तीन दिवस निर्धारीं । सावित्री करी उपोषण ॥ ७४ ॥ न घे फल मूल जीवन । अंध श्वशुर बोले वचन । ह्मणे माये करिसी उपोषण । कां निर्वाण मांडिलें ॥ ७५ ॥ पतीचा मृत्युदिवस आला जवळी । कोणा न सांगे वेल्हाळी । तों सत्यवान सकाळीं । वनाप्रति चालिला ॥ ७६ ॥ सावित्री देवी वारित । परि त्यास जवळी आला मृत्य । फरशी घेऊन निघत । फळें मुळें आणावया ॥ ७७ ॥ सवें निघे सुकुमार । हिंडती दोघे घोर कांतार । पतीचे चरण वारंवार । धुऊन चुरी वृक्षातळीं ॥ ७८ ॥ पर्यटन करितां तये वेळीं । अस्ताचला गेला चंडमौली । निशा घोर प्राप्त जाहली । झगमगती उडुगणें ॥ ७९ ॥ पतीस विनवी राजबाळा । आश्रमाप्रति स्वामी चला । तों वटवृक्षीं उभा ठेला । शुष्क काष्ठें मोडित ॥ ८० ॥ एक काष्ठ बळें मोडित । तें कपाळीं आदळलें अकस्मात । पाषाण जेवीं वर्मीं बैसत । पडिला मूर्च्छित सत्यवान ॥८१ ॥ देखोनि पतिव्रता धांवली । मुखीं मस्तकीं उदक घाली । मांडी आपुली उसां दिधली । वारा घाली निजपल्लवें ॥८२॥ रात्र एक प्रहर पूर्ण । तव्हां गेला पतीचा प्राण । लावण्यसागरींचें निधान । शोकार्णवीं पडियेलें ॥ ८३ ॥ ह्मणे उठा जी प्राणनाथा । आश्रमीं वाट पाहती मातापिता । मज सांडून तत्वतां । दुरि पंथा सेविलें ॥ ८४ ॥ पिता अंध माता अशक्त । प्राण देतील एकांत मात । उठा जाहलां क्षुधाक्रांत । बोला शब्द एक मजशीं ॥ ८५ ॥ माझे अन्याय बहुत । समर्थे घालावे पोटांत । रुसणें सांडून एक मात । मजसीं बोला प्रियकरा ॥ ८६ ॥ आपुली प्रिया सोडून उचित नव्हे या करितां गमन । तुह्मांस फल मूल जीवन । आणून कोण देईल ॥ ८७ ॥ अहा कर्म कैसें विचित्र भंगून गेलें

माझें छत्र। दिसे शून्य त्रिभुवनमात्र। काय करूं यापरी ॥ ८८ ॥ मज टाकून कांतारीं। सांगातिया गेला दूरी। शोक करितां सुंदरी। यम तेथें पातला ॥८९॥ त्याचा लिंगदेह काढून। यम चालिला दक्षिणपंथें घेऊन। सावित्रीनें प्रत्यक्ष देखोन। पाठी धांवे तयाचे ॥ ९०॥ मुखें करीत स्तवन। क्षणक्षणां घाली लोटांगण। ह्मणे महाराज तूं कोण। नाम खूण सांगे पां ॥ ९१ ॥ येरू ह्मणे मी यम जाण। तूं पतिव्रता थोर ह्मणोन। दूत न दिले धाडून। मीच आलों न्यावयातें ॥ ९२ ॥ ऋणानुबंध सरला पूर्ण। जाई भ्रताराचें करी दहन। येरी ह्मणे गेलिया प्राण। तुझे चरण न सोडीं मी ॥९३॥ पतिप्राणासांगातें आतां। मजहि नेई त्वरें समर्था। मी तुझी कन्या तत्त्वतां। उठवी जामाता आपुल्या ॥ ९४ ॥ तुझी कन्या वेल्हाळा। तीस वैधव्यशब्द नको दयाळा। यावरी प्रेतनाथ बोलिला। सहसा न घडे गोष्टी हे ॥ ९५ ॥ एक पतिप्राण वेगळा करून। माग तुज जाहलों प्रसन्न। मागसी तें देईन। बोल वचन सुकुमारे ॥ ९६ ॥ येरी ह्मणे द्युमत्सेन श्वशुर। देई त्यास महाराजा नेत्र। यम ह्मणे तुझा लागतां कर। येईल दृष्टि निर्धारें ॥ ९७ ॥ यावरी माघारी जाई आतां। ह्मणे सोडून तुजऐसा पिता। कोणीकडे जावें ताता। मज माहेरा न्यावें समागमें ॥ ९८ ॥ माझें भ्रतारचरणीं असेल मन। तरी तूं होशील दयाघन। संत महंत साधुजन। भावें वंदिले असतील जरी ॥ ९९ ॥ मग बोले विश्वहंता। पति वेगळा करून माग आतां। पतिव्रता ह्मणोनि तत्त्वतां। प्रसन्न जाहलों दुसऱ्यानें ॥ १०० ॥ यावरी बोले सुंदरी। श्वशुराचें राज्य दे झडकरी। तथास्तु ह्मणे भास्करी। आतां माघारीं जाई कां ॥ १०१ ॥ येरी ह्मणे दयाळा वैवस्वता। पतिसमागमें मज ने आतां। आह्मां चक्रवाकांस तत्त्वतां। आदित्यात्मजा एक करीं ॥ १०२ ॥ व्रत तप आणि दान। जरी घडलें असेल पूर्वींहून। माता पिता लक्ष्मी नारायण। मानून पूजि-

र्ली असतील ॥ १०३ ॥ अनाथ प्रेताचें दहन । केलें असेल दरिद्रियाचें लग्न । सत्समागम सच्छास्त्रश्रवण । सद्गुरुसेवन भावार्थें ॥१०४॥ तरी तुज दया उपजेल मनीं । मग तो बोले यम वाणी । सत्यवान वेगळा करूनी । माग साजणी अभीष्ट ॥ १०५ ॥ माझ्या पित्यास शत पुत्र । देई अर्कजा तूं सत्वर । धर्मराज देत उत्तर । तथास्तु ऐसें त्रिवाचा ॥ १०६ ॥ बाई तुझी भीड फार । म्हणून दिधले इतके वर । आतां जाई सत्वर । अग्नि देई पतिलागीं ॥ १०७ ॥ बोले पतिव्रताशिरोरत्न । दुष्काळामाजीं अन्नदान । तृषार्तासी जलपान । करविलें असेल उष्णकाळीं ॥ १०८ ॥ व्याधिग्रस्त दुर्बळ क्षीण । त्याचें केलें असेल रक्षण । हरिस्वरूप मानून । जरी ब्राह्मण पूजिले मीं ॥ १०९ ॥ हरिहरां अभेद पूर्ण । मानून केलें असेल भजन । हरिकथापुराणश्रवण । केलें असेल भावार्थें ॥ ११० ॥ तरीच मज देखोन । दयाळु होय भानुनंदन । मग यम बोले हांसोन । चतुर्थ वर माग कां ॥ १११ ॥ व्यर्थ शब्द तत्त्वतां । मज नको दयाळा आतां । शतपुत्री सफळ ताता । उदरलतिका करी माझी ॥ ११२ ॥ पुत्रवती गुणवती । जन्मसावित्री सौभाग्यवती । मंगलमाहेश्वरी मज म्हणती । करी ख्याती त्रिभुवनीं ॥ ११३ ॥ फळावीण तरु जाण । कीं वेदघोषावीण द्विजसदन । हरिस्मरणावीण वदन । व्यर्थ जैसें पशु-वत ॥ ११४ ॥ तैसी कुळीं नसतां पुत्र । कैसा होईल वंश पवित्र । मी तुझें ताता कृपापात्र । करी माहेर कन्येसी ॥ ११५ ॥ तुजसंगें पंथ क्रमिला आतां । नाहीं मज ऐशी सौभाग्यसरिता । मज रिक्तामें सर्वथा । दवडूं नको या वेळीं ॥ ११६ ॥ श्राद्धदेव होऊन दयाळ । म्हणे कन्ये तुज दिधलें सकळ । तुझे गुण देखोन निर्मळ । संतुष्ट जाहलों सर्वस्वें ॥ ११७ ॥ सावित्री म्हणे सर्वज्ञमूर्ती । बोले सत्यवानास आयुष्य किती । येरु म्हणे तूं मम कन्या सुमति । महासती विख्यात ॥ ११८ ॥ चार शत वर्षेपर्यंत । सत्यवान आयुष्यवंत ।

तुज होतील शंभर सुत । पौत्रहि बहुत देखसी ॥ ११९ ॥ वैरी नासती सर्वथा । सकल राज्य येईल हाता । तूं पतीपाशीं जाई आतां । स्पर्शतां प्राण येईल पैं ॥ १२० ॥ मग तो दक्षिणदिशेचा इंद्र । अंतर्धान पावला सत्वर । सावित्रीस आनंद थोर । भ्रतारासान्निध पातली ॥ १२१ ॥ हनुवटीस लावून हात । ह्मणे प्राणवल्लभा उठा त्वरित । तंव तो गडबडोन उठत । आलिंगित प्राणप्रियें ॥ १२२ ॥ ह्मणे तूं श्रमलीस फार । फळें भक्षी न करी निराहार । येरी ह्मणे सासूश्वशुर । त्यांवीण न भक्षीं सर्वथा ॥ १२३ ॥ भाग्य येई दरिद्र सरतां । तेवीं उदय पावे यमपिता । स्वर्गाहून सकल पतिव्रता । सावित्रीदर्शना पातल्या ॥ १२४ ॥ कुंभिनीवरील सर्व कामिनी । षोडशोपचारें पूजा घेऊनी । वटवृक्षातळीं येऊनी । पूजिती सावित्रीसत्यवान ॥ १२५ ॥ सौभाग्यद्रव्यें अर्पून । वटवृक्षास करिती प्रदक्षिण । वटसावित्री तेंपासून । अद्यापि पूजिती सर्व वनिता ॥ १२६ ॥ जी न पूजितां गर्वे राहे ॥ ती जन्मोजन्मीं विधवा होये ॥ आचरती त्यांतें सौभाग्य पाहे ॥ सर्वदाहि वर्धमान ॥ १२७ ॥ असो यावरी सावित्री सती । भ्रतारास धरून हातीं । जात आपुलें स्थलाप्रती । चालें तापवी पतीतें ॥ १२८ ॥ सिंह व्याघ्र सर्पादि येऊन । सावित्रीचे वंदिती चरण । माते तुझें घेतां दर्शन । निष्पाप आह्मी जाहलों ॥ १२९ ॥ सावित्री ह्मणे पतीलागून । तुमचे निजकेशीं झाडीन चरण । हळू चला कंटक पाषाण । चरणीं रुतती सुकुमारा ॥ १३० ॥ तों इकडे काय जाहलीं पुत्रसून । दोघें वृद्ध करिती रोदन । त्यांचा शोक ऋषि एकोन । धांवोन समाधान करितांनी ॥ १३१ ॥ तों अकस्मात येऊन । उभीं ठाकलीं पुत्रसून । सावित्री स्पर्शतां नयन । उघडले तत्काळ तयांचे ॥ १३२ ॥ जाहला एकचि ब्रह्मानंद । गगनीं पाहती निर्जरवृंद । दिव्य सुमनें सुगंध । वर्षती तेव्हां उल्हासें ॥ १३३ ॥ वृद्धांस फळें अर्पून तत्त्वतां । देता जाहला मग समस्तां । तों दळभार

वाद्यांसह येतां । मंत्री देखिले द्युमत्सेनें ।। १३४ ।। वैरी प्रधानें निवटोन । सर्वांस चालला घेऊन । रत्नजडित शिबिकेंत निधान । सावित्री देवी बैसविली ।। १३५ ।। मागें पुढें दळभार घेऊन । स्त्रीपुत्रांसमवेत द्युमत्सेन । दिव्यवाहनीं बैसोन । वाद्यगजरें चालती ।। १३६ ।। सत्यवानावरी छत्र । पित्यानें धरिलें पवित्र । सावित्रीस शतपुत्र । पित्याशीं समान जाहले ।। १३७ ।। ऐकोन कन्येची कीर्ति । दर्शना धांवला अश्वपति । सावित्रीच्या वरें तो नृपति । शतपुत्र पावला ।। १३८ ।। लोमश ह्मणे धर्माप्रति । ऐशी सावित्रीची सत्कीर्ति । तेवीं हे द्रौपदी सती । श्रीरंगभगिनी पतिव्रता ।। १३९ ।। सावित्री सत्यवानांचे परी । तुह्मी स्वराज्य पावाल झडकरी । हें चरित्र ऐकतां नरनारी । दीर्घायुषी होतील ।। १४० ।। स्त्रियांस सौभाग्य पूर्ण । पुरुषांस ऐश्वर्य कल्याण । महारोग होय हरण । गंडांतर मृत्यु निरसे पैं ।। १४१ ।। धर्म मार्गें तीर्थास जातां । लोमशें सांगितली जे कथा । कथारूपें हे तत्वतां । चंपकमाला सुवासिक ।। १४२ ।। मूर्ख जे मतिमंद मिलिंद । त्यांस नावडे तथिचा सुगंध । पुढें चित्त द्या सज्जनवृंद । कथेलागीं अत्यादरें ।। १४३ ।। श्रीधर ह्मणे ब्रह्मानंद पिता । सावित्री माता गुणसरिता । त्यांस वंदिलें पुढें आतां । कथा परिसा नवलाचि ।। १४४ ।।

---

## मोरोपंतकविकृत सावित्रीगीत.

मद्रदेशीं होता राजा महामती । नामें अश्वपती साधुमान्य । आलें वृद्धपण नाहीं पुत्ररत्न । केले बहू यत्न करावे ते । सावित्री देवीचें करी आराधन । देह दारा धन समर्पुनी । निष्ठेनें सर्वदा अष्टादश वर्षें । जप होम हर्षें चालवीतां । अग्निकुंडांतुनी प्रगटली देवी । अश्वपती ठेवी पायीं शीर ।। ५ ।। देवी ह्मणे माग; राजा ह्मणे माते ।

पुत्रदानें दाते लाजवावे । सावित्री ह्मणे म्यां स्वामी दयानिधी । विन-
वीला विधी तुजसाठीं । दिली तूज पुत्रशताहुनी धन्या । पतिव्रता
कन्या विचारूनी । ऐसें सांगोनी ती देवी गुप्त झाली । कन्या पोटा
आली मालवीच्या । पुत्राचें तसें च विर्धानें बा ! रसें । सुदिनीं बारसें
तिचें करी ॥ १० ॥ जिणें पूर्ण केला वरदानें काम । ठेवी तीचें
नाम कन्यकेसी । रूपें गुणें कांहीं उणी न सावित्री । तशी नसावी
त्रिभुवनांत । तिला न मागती राजपुत्र गुणें । स्वरूपासी ऊणें जा-
णोनीयां । राजा चिंता करी झाली उपवर । अनुरूप वर न ये कोणी
सावित्रीला ह्मणे वत्से लग्नकाळ । आला न भूपाळ कोणी मागों
॥ १५ ॥ तूंची स्वयें योग्य वर पहा जा गे ! । कोणी ही न मागे
येऊनीयां । या माझ्या वचनें तुवां न कोपावें । तुज म्यां ओपावें
योग्य हस्तीं । सावित्री पित्याची आज्ञा मान्य करी । ठेवी पायांवरी
मस्तकातें । पित्याचा प्रधान कुलगुरु दाया । आप्तसमुदायासह निघे ।
गेली पृथ्वीवरी पहावया वरा । करी शोध बरा देशोदेशीं ॥ २० ॥
शोधी ती मानेसा नवरा जीवाला । नव राजीवाला जसी भृंगी । रसी-
कासी जशी कवीता तीं सती । पाहे योग्य पती जनीं वनीं । एके दिवशीं
आला संसारपारद । श्रीमुनी नारद मृत्युलोकीं । अश्वपतीला तो भेटे
तपोधन । चातकाला घन स्वयें जसा । अश्वपती पावे सुखास नमूनी ।
सुखासन मुनी अंगीकारी ॥ २५ ॥ सुधारस तूपें कीं सागर कूपें ।
तसा मुनी भूपें सत्कारीला । उद्धराया अश्वपतीराय कवी । कथा
आयकवी पुरातना । अशा समयांत सावित्री ही आली । पायीं नम्र
झाली दोघांच्याहि । नारद विलोकी करूनीयां कृपा । ह्मणे ' तुझी
नृपा कन्या कीं हे । कोठें गेली होती कोठोनी ही आली । सत्य
श्रीचि आली रूपें गुणें ॥३० ॥ अहा उजवीलें कां न कन्यकेला ।
ईणें धन्य केला न कां कोणी । राजा ह्मणे स्वामी हेची भूमीवर ।
पहावया वर धाडीली म्यां । आतांची आली हे सावित्री या धामीं ।

इचें वाक्य स्वामी आयकावें । वत्से! सांग कोण वर त्वां पाहीला । एकाया राहीला स्वस्थ मुनी, । सावित्री ह्मणे 'हो शाल्वदेशपती । द्युमत्सेन अति ख्यात आहे ॥ ३५ ॥ धर्मन्यायनिष्ठ दाता सत्यसंध । झाला दैवें अंध वृद्धपर्णी । आलें अंधपण पुत्र तोही बाळ । असा कष्ट काळ प्राप्त होतां । शत्रूनें हरूनी राज्यभ्रष्ट केला । सस्त्रीपुत्र गेला तपोवनीं । साहोनी या वर्षा हिमा आतपाला । तो महा तपाला करीतसे । त्याचा पुत्र नामें सत्यवान् सुमती । वरीला तो पती भावें मनें ॥ ४० ॥ मुनी ह्मणे 'केलें सावित्रीनें खोटें । यांत पाप मोठें काय सांगों । सत्य बोलतसे द्युमत्सेन राजा । बोले त्याची भाजा ते ही सत्य । स्वयेंही तो सत्य सर्वदा बोलतो । सत्येंचि डोलतो तपोवनीं । चित्रीं लीही अश्व मृत्तिकेचे घडी । हाची घडीघडी छंद त्यास । ह्मणोनी सत्यवान् चित्राश्व हीं नांवें । मुनींनीं स्वभावें ठेवीयलीं ॥ ४५ ॥ आह्मां ठावें आहे त्याचें वृत्त सारें । आमुच्या विचारें चुकली हें'। राजा ह्मणे 'रूप बरा आहे तो कीं'। मुनी ह्मणे 'लोकीं तसा कैंचा'। राजा ह्मणे 'जाणे विद्या कळा कांहीं । मुनी ह्मणे नाहीं तसा मुज्ञ'। राजा ह्मणे 'शौर्य कसा असे बोला'। मुनी ह्मणे 'तोला महेंद्रासी'। राजा ह्मणे 'आहे विप्रगुरुभक्त'। मुनी ह्मणे 'व्यक्त भक्तीरस' ॥ ५० ॥ राजा ह्मणे 'तरी नसेल तो दाता' मुनी ह्मणे 'होता त्याच्या गांवें'। राजा ह्मणे 'तरी क्षमा नाहीं काय'। मुनी 'ह्मणे होय नायकों हें'। राजा ह्मणे 'पाहे हरिहरां भेद । तेणें तूज खेद वाटतसे'। मुनी ह्मणे 'शिव! शिव! हरिहरी । त्याची फार बरी दृष्टी आहे'। राजा ह्मणे 'त्याच्या कोण दोष आंगा । स्पर्शलासे सांगा तुह्मी स्वामी' ॥ ५५ ॥ मुनी ह्मणे 'गुणग्रामा एक थोर । दोष चंद्रा घोर राहू जसा । त्या गुणमंदारा वर्षमात्र आयु । जातां काळ वायू उन्मूळील'। राजा ह्मणे 'तृषा हरी त्या मुन्सरा । सेवावे दूसरा पहा बाई'। सावित्री ह्मणे 'जे

वरीला म्यां मनें । तोची गुरुजनें द्यावा मज । तो सत्यवान् सत्य पती हो कल्पायू । किंवा हो अल्पायू अन्य पीता ॥ ६० ॥ त्यालाची वरील तूमची हे कन्या । तुम्हांसम अन्या पहातसें ' । मुनी ह्मणे ' राया स्थीरबुद्धी कन्या । हे सावित्री धन्या निश्चयाची । सत्यवंता ऐसा गुणी नाहीं कोणी । पाहीली म्यां क्षोणी विचारूनी । चित्रा-श्वाकारणें द्यावें कन्यादान । कांहीं अनमान करूं नको । धर्मे वर्ते त्यांचा ईश्वर केवारी । सर्वानर्थ वारी धार्मीकांचे ॥ ६५ ॥ तुम्हां समस्तांचें कल्याण असावें । जातों मीं बसावें स्वस्थ तुवां ' । ऐसें बोलोनी तो मुनी स्वर्गा जाय । गेला तोही राय तपोवना । द्युमत्से-ना भेटे ह्मणे अश्वपती । ' तुझ्या पुत्राप्रती कन्या देतों ' । द्युमत्सेन ह्मणे ' आमूची हे गती । अन्य क्षितीपती काय थोडे । तुझी एकू-लती कन्या भाग्यवती । सुखोचिता अती सुकुमारी ॥ ७० ॥ नाहीं सुखगंध राज्यभ्रष्ट अंध । अशासीं संबंध कां रुचला ' । अश्वपती ह्मणे ' सत्वशीलधन । हेंहि सुज्ञजन इच्छितात । संकटाला भीऊं नये सत्त्वरते । जातें सत्वर तें सोडूनियां । निश्चयें घेऊनी आलों कन्यकेला । अर्थी धन्य केला पाहिजे हो ' । द्युमत्सेन ह्मणे ' अतीथी तूं पूर्ण । तुझा काम पूर्ण करावाची ' ॥ ७५ ॥ पाचारीले त्यांहीं सर्व तपोनिधी । लग्न यथाविधी संपादिलें । परमार्थदृष्टी हिमालयापरी । कन्यादान करी अश्वपती । कन्या निरवितां पडे महीवर । राया गहींवर आवरेना । सावित्री पित्याच्या नेत्रांतें पदरें । पुसोनी आदरें समजावी । घेऊनी निरोप निघे अश्वपती । ती सावित्री सती स्वस्थ राहे ॥ ८० ॥ हर्षली पात्रीनी जसी सती स्वर्गा । वनाहुनी स्वर्गा तुच्छ मानी । तसीच सावित्री आनंदली मनीं । क्रीडे तपोवनीं पतीसंगें । वांटी बहू स्वल्प वस्त्रें नग ठवी । वल्कलें ती देवी सुखें नेसे । श्वशूराची आज्ञा जसीच वेदाची । तीळ ही भेदाची बुद्धी नाहीं । कुळदेवताचि ती श्वश्रू मानीली । पूजीली वानीली

सावित्रीनें ॥ ८९ ॥ केवळ अतिथी अभ्यागत बाळ । करी प्रतीपाळ माता तसी । मानीयला शाकफळ मूळकंद-। रसाहुनी मंद सुधारस । बोलावें सस्मित मृदु परिमित । सत्य प्रिय हित बोलवील्या । सर्वांच्या मागूनी तृणशय्येवरी । सुखें निद्रा करी उठे आधीं । एकांतीं पतीचें हृदय रमवी । संताप शमवी सेवाधर्में ॥ ९० ॥ न पडे विसर मुनी-च्या शब्दाचा । अवधी अब्दाचा सदा मोजी । जसा तो अवधि होय देह उणा । नित्य ताप दूणा सावित्रीचा । उरले दिवस अवधीचे चार । व्रताचा विचार करी मनीं । उपोषण तीन दिवस करावें । शेवटीं मरावें पतीसह । त्रिदिनव्रताचा संकल्प करूनी । बैसली धरूनी नियमानें ॥ ९५ ॥ दुःख पावे राजा तिच्या त्या निश्चयें । आहारार्थ स्वयें असे प्रार्थी । ह्मणे ' बाई ! मज अंधाकडे पाहे । उपोषण कां हें आरंभिलें । मुली हा उपास तिसरा कीं अहा ! । कां हे कष्ट महा करीतीस । गुर्वाज्ञापालनव्रत कुलीननें । बाई मुली नेतें सुखें स्वर्गा ' । सावित्री ह्मणे ' जी ! नका होउं श्रमी । उद्यां व्रतास मी उजवीन ॥ १०० ॥ कळेल करितें व्रत ज्या कारणें । करीन पारणें उद्यां याचें । राजा ' ह्मणे तरी घडो हें अव्यंग । कोणीं व्रतभंग करूं नये । न भोगितां असी संतापतीव्रता । संता पतिव्रता सदा मान्या ' । ऐसें सांगोनीयां हित उगा राहे । राजा वाट पाहे उदयाची । चवथे दीवसीं प्रातःकाळीं सती । समाप्त व्रत ती करी भावें ॥ ५ ॥ नमस्कारी श्वश्रू श्वशूरचरणा । पतीच्या मरणा चुकवाया । ऐसें ह्मणती ' सौभाग्यवती पुत्रवती । चिरकाल पतीसह नांदे ' । ऐसेंचि ह्मणती तपोधन मुनी । मागतां नमूनी आशीर्वाद । आशीर्वादवर गुरूंचे साधिले । पदरीं बांधिले सावित्रीनें । आली तपोधना करूनी प्रणती । वडील ह्मणती मुक्ती करीं ॥ १० ॥ विनवी जोडूनी हात त्यांकारणें । करीन पारणें अस्तमानीं । मनीं च सावित्री वाहे काळजीला । दिसे काळ जीला क्षणक्षण । सत्यवंत स्कंधीं परशू वाहोनी । चीकडे पाहोनी वना निघे ।

सावित्री ह्मणे 'जी ! मी येत्यें वनाला । वियोग मनाला न सोसवे' । तो ह्मणे 'त्वां केलीं उपोषणें तीन । झालें शक्तीहीन देह प्रिये ॥१५॥ वर्णावीं पाऊलें तुझीं नवनीतें । गमन वनीं तें कठीणांचें । सुखद नव्हे तें दुःखद कानन । ह्मणसी कां न न आतां येतों' । सती ह्मणे 'मज दुःखांतही सूख । तुमचें श्रीमूख विलोकीतां । स्वामीसंगें मज न बाधेल ताप । जसा भवताप संतसंगें । सत्यवंत ह्मणे 'कांते ! न रुसावें । तुवां हें पुसावें वडीलांस' ॥ २० ॥ सासूसासऱ्यांतें ह्मणे 'न कोपावें । मज हें ओपावें वरदान । फळें आणावया जातात वनास । माझ्याही मनास वाटे जावें । वर्ष झालें आल्या सोडूनी माहेर । आश्रमाबाहेर गेल्यें नाहीं । स्वामीसमागमें तपस्वीशरण्य । पाहेन अरण्य आज्ञा द्यावी' । राजा ह्मणे 'बाई ! वर्षांत त्वां कांहीं । मागीतलें नाहीं आह्मांपासीं ॥ २५ ॥ वन पाहावयाची आज्ञा मागतेस । पायां लागतेस तरी जावें । वत्से ! तूं उपासी सुकुमारी बाळा । शीघ्र या, सांभाळा अन्योन्यांतें' । वंदूनीयां सती निघे झडकरी । धैर्य धड करी हृदयातें । पुष्पीत फळीत तरु मृग पक्षी । वनांतरीं लक्षी राजकन्या । पतीच्या सुखार्थ बळें आणी हास्य । मयूरांचें लास्य विलोकूनी ॥ ३० ॥ विनोदवचनें पतीतें डोलवी । दाटूनी बोलवी पुण्यकथा । एके नेत्रें प्रिया एके नेत्रें काळा । पाहे राजबाळा हृष्टा भीता । चित्राश्व वेंचूनी फळें पात्र भरी । मग काष्ठावरी घाव घाली । शक्तीहूनी बहू घडतो आयास । तयाच्या कायास घर्म आला । कठीण काष्ठाच्या करीतां भेदना । उठली वेदना शिरीं भारी ॥ ३५ ॥ ह्मणे 'प्रिये ! शूळ उठलें मस्तकीं । धांवूनी हस्तकीं साध्वी ! धरी' । ह्मणे 'कधीं झाला असा खेद नाहीं । शिरोवेदनांहीं धैर्य गेलें । जाणों शूळाघातें मस्तक फाटतें । मनांत वाटतें निजावेंसें' । पतीच्या मस्तकास्वालीं घाली मांडी । जाणों उशी मांडी कुसुमांची । धरूनी मस्तक मनीं ह्मणे बाळा । 'आला ठेकताळा भविष्याला' ॥ ४० ॥ तों

पुरुष पाशहस्त उभा आहे । असें साध्वी पाहे पुण्यबळें । रक्तनेत्र कृष्णवर्ण तेजें अर्क । काळ असा तर्क मनीं केला । हळूचि मस्तक उतरूनी ठेवी । उठोनी ती देवी हात जोडी । ह्मणे ' बा ! तूं देव काय तुझें नाम । कोण कार्य काम मज सांग ' । काळ ह्मणे ' शुद्धा ह्मणोनीच तुज । सांगतों मीं गुज पतीव्रते ! ॥ ४९ ॥ करितां जीवाची प्राणहानी यम । जाण हा नियम व्रतसिद्धे ! । सरलें आयुष्य नीयत मान्या या । प्रियतमा न्याया तुझ्या आलों ' पतिव्रता ह्मणे ' दूत कीं येतात । जीवाला नेतात तुजकडे । स्वयें कां आलास काय केले दूत । प्रभूस प्रभूत श्रम झाला ' । यम ह्मणे ' पितृभक्त सत्यवंत । यासी सर्व मंत मानवतीं ॥ ५० ॥ कोणी रूपें गुणें नाहीं असा मान्य । सत्य असामान्य सत्यवंत । दूत कसा धाडूं न्यावया अशाला । रक्षाया यशाला स्वयें आलों । ऐसें बोलोनीयां तो देव कीनाश । घालोनीयां पाश बळें ओढी । पुरुषासी राजा काढी गेहांतूनी । तसा देहांतूनी काढियेला । पुरुष काढीतां अंगुष्ठप्रमाण । निष्प्रभ निष्प्राण देह झाला ॥ ५५ ॥ पाशांनीं बांधोनी सूक्ष्म पूरुषाला । घेउनी निघाला धर्मराज । यापरी होऊनी कृतकार्य काळ । निघाला तत्काळ दक्षीणेला । त्यामागूनी साध्वी तसीच निघाली । न तिच्या रिघाली मनीं शंका । सतिव्रतें तिच्या अंगा सिद्धी आली । आकाशांत झाली गति प्राप्त । करी मनुष्यत्वापासूनी सुटका । जड ही गुटका न कां धर्म ॥ ६० ॥ यम ह्मणे ' दूर पावीत आलीस । सावित्री ! झालीस उतराई । जा उत्तम लोक प्राप्त व्हाया प्रिया । करी सांग क्रिया यथाशक्ति । सावित्री ह्मणे ' गा ! देहासवें छाया । जसी तसी जाया पतीसवें । प्राण जाऊं द्यावे पती न सोडावा । स्वधर्म जोडावा मुख्य हाची । गुरूंच्या तुझ्याही प्रसादें आजी या । गतीला माझीया विघ्न नाहीं ॥ ६५ ॥ सात पदें गांठी जरी मार्गीं पडे । तरी मैत्री घडे सज्जनासीं । या न्यायें तुजसीं सख्य झालें वाटे । दोघें एके वाटे चालतसों । तुजसीं बोलत्यें कांहीं

मित्रभावें । तें त्वां आयकावें धर्मराजा ! । इंद्रियें जिंकिल्याविना केलें कर्म । त्यासी संत धर्म न ह्मणती । गृहस्थाश्रमांत सर्व धर्म घडे । तेणें मळ झडे अंतरींचा ॥ ७० ॥ विषयवासनामळ जातां ज्ञान । होय समाधान आत्मलाभें । गृहस्थाला सोपें न तसें अन्यास । न लागे संन्यास ज्ञानासाठीं । असें म्यां एकिलें एसेंच कीं बा ! हें । विचारूनी पाहें धर्मराजा ! । धर्म ह्मणे ' बाई मदालसा धन्या । कीं तूं ' नसे अन्या आढळली । रोमांच माझीया देहीं उभारती । तुझी सुभारती आकर्णितां ॥ ५ ॥ ' पतीविना देतों एक वर मागें । जा फिरोनी मागें भागलीस ' । साध्वी ह्मणे ' देमी जरी आज वर । तरी राजवर द्युमत्सेन । त्याचें अंधपण वृद्धपण जावें । गेलें तेज यावें अनायासें ' । यम ह्मणे ' हें म्यां दिलें महाभागे ! । परतोनी जा गे भागलीस ' । साध्वी ह्मणे ' मला कांहीं नाहीं श्रम । पतीसमागम सुखमय ॥ ८० ॥ दुर्लभ सत्संग दैवें प्राप्त जाला । सत्संगानें धाला नाहीं कोण । सत्संग दीना श्री वना दे वसंत । धना देव संत ज्ञाना देती । सत्संग दुर्लभ कामप्राप्तिहेतु । सत्संग हा सेतू भवार्णवीं ' । यम ह्मणे ' बाई तुझी दिव्य दृष्टी । अमृताची वृष्टी तुवां केली । बोलतेस जैसें श्रुतीनें बोलावें । एकतां डोलावें जडांनींही ॥ ८५ ॥ वेधील विधीला बाई बोल तुझा । पतीविना दूजा वर माग ' । पतिव्रता ह्मणे ' स्वराज्या आसरा । हो माझा सासरा द्युमत्सेन । कोणाही निमित्तें स्वधर्म न सोडू । सज्जनाच्या जोडू प्रसादातें ' । धर्म ह्मणे ' दिलें जा बाई ! आश्रमा । त्वत्तनू या श्रमा योग्य नव्हे । सावित्री ह्मणे ' जे ज्ञान न जोडिती । न तयां सोडीती तुझे पाश ॥ ९० ॥ नरकीं जीवास भोगवीसी ताप । केलें असे पाप ज्यांहीं जैसें । त्वां पापी सर्वही निरयांत नेला । चिर यातनेला भोगवाया । शुद्ध पूरउनी काम सभाजीला । तामस भाजीला कुंभीपाकीं । जो द्रोह न करी कोणाही भूताचा । त्या तुझ्या दूताचा धाक नाहीं । जो कोणी

सर्वत्र करी अनुग्रहा । त्यासी अनुग्र हा तुझा देह ॥ ९५ ॥ सर्वत्र अद्रोह अनुग्रह दान । हें त्रय निधान कल्याणाचें ॥ संतांच्या ठायीं हे धर्मत्रय वसे । इतरत्र नसे क्षणमात्र ॥ संतांसी जो आला शत्रूही शरण । तयासी मरण न ते देती ॥ सर्वांही संतांत मुख्य तूं या ! धर्म । तुझें पुण्यकर्म काय वर्णूं ' ॥ यम ह्मणे ' जशी तान्हेल्यासी सुधा । तुझी वाणी बुधा मज तशी ॥ २०० ॥ पतीविना इष्ट वर माग तीजा । वर मागती जा श्रमी न हो ' ॥ सती ह्मणे ' ताता दे औरस शत । पुत्र धर्मरत वंशकर ' ॥ यम ह्मणे ' शुचिव्रतारंभरते । आते शंभर ते पाहासील ॥ स्वस्थाना जा शीघ्र दूर तूं आलीस । श्रमी कीं झालीस बाढ वेळ ' ॥ साध्वी ह्मणे ' आहे पतीसन्निधान । अती सन्निधान सुखाचें हें ॥ ५ ॥ तुझा उत्पादक विश्व भासविता । देव हा सविता जगदात्मा ॥ ६ ॥ अत्यंत हित तूं सम पुण्यकाम । सत्य तुझें नाम धर्मराज ॥ फळतो दगड धरितां विश्वास । हें आहे विश्वास अवगत ॥ मग संतीं दृढ ठेवूनी विश्वास । सोडीला निश्वास उष्ण कोणीं ॥ यम ह्मणे ' बाई ! धन्या तूं सुशीला । आलीस कुशीला जीच्या ती ही ॥ १० ॥ दिलें त्वां सूख हें वर्णवे दान न । वर्णे वेदानन व्यालें असे ॥ तुझ्या शब्दामृता तृप्तीच्या हेतूला । प्राशुनी हे तुला कर्ण गाती ॥ पतिविना वर मागें चवथा न । मागें चव थान ठेवीं पानीं ' ॥ ती सती मुरली गाय कृष्णसार । काय कृष्णसार यम-धर्म ॥ ' चित्राश्वाची जाया योग्य पुत्रशत । पावो सतीव्रत स्वस्थ राहो ' ॥ १५ ॥ ह्मणे ' दिले पुत्र शंभर हिताचे । दंभरहिताचे धर्म जैसे ॥ आतां तरी बाई सावित्री परतें । भूमीला भर तें झालें शव ' ॥ साध्वी ह्मणे ' देवा ! जी धर्मसंतती । इच्छिती संत ती धर्मासाठीं ॥ संतांची शाश्वत धर्मीं चित्तवृत्ती । अधर्मीं प्रवृत्ती स्वप्नीं नसे ॥ संतांची संसारनदीनौका कथा । त्यां संतांसी व्यथा कासयाची ॥ २० ॥ साधुसंत गंगायमुनांचे ओघ । हा संगम मोघ कधीं नाहीं ॥

संतांपासुनीयां संतां भय जालें । असें काना आलें नाहीं कधीं ॥ संत चालवीती सत्यें तरणीतें । तपें धरणींतें धरीताती ॥ किंबहुना संत सर्वांची ही गती । संत मुक्तीपती संत ज्ञान ॥ व्रत चालवीते एक संतराय । नामें अंतराय जाती दूर ॥ २५ ॥ प्रसाद शाश्वत अर्थ बहूमान । यांचें मूलस्थान संत तुम्ही ' ॥ यम ह्मणे ' वाणी नव्हे बोलकी ती । बाई बोल कीती तूझे वर्णूं ॥ तुज वर्णावया नाहीं मज शक्ती । तुझ्या ठायीं भक्ती माजी झाली ॥ पांचवा अद्भूत वर महाभागे ! । माग न हा भागे वर देतां ' ॥ सावित्री ह्मणे ' बा देवा ! वरदान । तुझें वरदान न व्यर्थ व्हावें ॥ ३० ॥ स्वसत्य सांभाळा मत्पती वांचवा । द्या वर पांचवा हाचि मज ॥ स्वर्गभाग्यसुख शतपुत्र जीणें । नको पतीविण मज देवा ॥ वांचवावा माझा भर्ता सत्यवंत । देवा सत्यवंत त्वांही व्हावें ॥ शतपुत्रवर दयेनें देऊनी ॥ पतीला घेऊनी कसा जासी ' ॥ धर्म ह्मणे ' बाई ! प्रताप हा भला । जिंकीलें त्वां मला पतिव्रते ! ॥ ३५ ॥ मार्केडया जशी तारी शंभुभक्ती । तशी तुझी शक्ती सत्यवंता ॥ बाई म्यां तुझा हा भर्ता केला मुक्त । यासीं तूं हो युक्त चिरकाळ ॥ पतीसह राज्य चार शत वर्षें । करीसील हर्षें धर्मन्यायें ॥ षड्रिपू होतील नत पतिव्रते । न तप तीव्र ते साहतील ' ॥ ऐसें सांगोनी तो गुप्त झाला धर्म । प्रकटलें शर्म सतीमनीं ॥ ४० ॥ आली जेथें होतें वनीं कलेवर । मनीं केले वर चमत्कार ॥ वेंसे घेऊनी तें शिर मांडीवर । चिर मांडी वरशुश्रूषा ती ॥ संज्ञा पावोनी तो उघडी नयन । करूनी शयन उठलासा ॥ वाटे जाऊनी तो आला परदेशा । सती वरदेशा मनीं वंदी ॥ पदरें पूसोनी मुख घाली वारा । जंव सती दारा मोतपर्रा ॥ ४५ ॥ म्हणे ' कांते ! तुज चिर भागविलें । कां न जागविलें तुवां मज ॥ पुरुष ओढीत होता मज श्याम । तो कोठें तन्नाम काय सांग ॥ पाहिला स्वप्नीं कीं सत्य तो देखीला । म्यां मनीं लेखीला सत्य काळ ' ॥ सावित्री ह्मणे ' तो

पापपुण्यकर्म । फळदाता धर्मराज देव ॥ गेला स्वस्थानाला आह्मी जाऊं चला । तुह्मी न उचला भार कांहीं ॥ ५० ॥ रात्रि झाली गुरू चिंतला वाहात । वाटेला पाहात असतील ॥ निजलों त्वदंकीं जसा घोरत मीं । तसा घोर तमीं देखिला तो ॥ स्वप्न कीं सत्य हें कसें काय सांग । आठविनां अंग थरारतें ' ॥ साध्वी म्हणे ' तुह्मी न धरावी व्यथा । सांगेन हे कथा उद्यां सारी ' ॥ सत्यवंत ह्मणे ' अंधकार दाट । वनीं कसी वाट सांपडेल ' ॥ ५५ ॥ सती ह्मणे ' शुष्क वृक्षीं तो दहन । दिसतो गहन प्रकाशी तो ॥ उपाय दिसाया वाट भला तमीं । चला अलात मीं हातीं घेत्यें ॥ अथवा नसेल शक्ति तरी राहूं । प्रातःकाळीं पाहूं गुरूंप्रती ' ॥ सत्यवंत ह्मणे ' वृद्ध मायबाप । पावतील ताप वियोगानें ॥ घडींत शतदा मज स्मरतील । शोकें मरतील निःसंदेह ॥ ६० ॥ मीही शोकें प्राण सोडीन हें जाण । सत्य तुझी आण वाहातसें ' ॥ ऐसें ह्मणोनी तो पितृभक्त रडे । सत्यवंत पडे स्त्रीच्या गळां ॥ सावित्री ह्मणे ' स्यां स्वधर्म जोडीला । असेल सोडीला दुष्ट मार्ग ॥ तरी यांसी त्यांसी सुखें भेटी घडो । संकट न पडो कोणा कांहीं ' ॥ सत्यवंत ह्मणे ' कसें तरी करीं । सावित्री ! उद्धरीं दुःखांतूनी ' ॥ ६५ ॥ उठोनी प्रथम स्वकेश सांवरी । सावित्री त्यावरी सत्यवंता ॥ चित्राश्व सतीच्या बळें उभा राहे । पात्राकडे पाहे फळांच्या तो ॥ सती ह्मणे ' येव्हां वृक्षीं राहो पात्र । परशु हा मात्र मीच घेत्यें ॥ जेणें सर्प शुंडाहंकार तोडावा । पतीचा तो डावा रम्य बाहू । वाहे वामस्कंधीं आपुल्या ती सती । स्वदक्षानें पती आलिंगूनी ॥ ७० ॥ निघाली तीं वनीं चंद्रिका दिवटी । होउनी निवटी अंधकारा । एरीकडे आली द्युमत्सेना दृष्टी । दिसे सर्व सृष्टी यथापूर्व । गेलें अंधपण नुमजला तो हें । झाला पुत्रमोहें पुन्हां अंध । भार्येसह नृपें सर्वांही ऋषींतें । पुसीलें तृषीतें जसें पाणी । शोधूनी सस्त्रीक भूप तो रडला । मूर्छीत पडला पुत्रशो-

कें ॥ ७५ ॥ करिती विलाप जेव्हां ते दंपती । समाधि-संपत्ति ब्राह्मणांचें । मिळाले पावोनी ताप सखेद हा । तापस खेद हा निवाराया । स्त्रीसह तो राजा आश्रमांत नेला । त्यांहीं बोध केला परोपरी । सुवर्चा गौतम दाल्भ्य मुनिराज । धौम्य भरद्वाज आपस्तंब । ह्मणती 'संताप हा जाईल क्षणें । उत्तम लक्षणें सावित्रीचीं ॥ ८० ॥ सुचविती दृष्टीलाभ महोदया । एका अहो! दया देवाची हे । धरीं ब्राह्मणाच्या वचनीं विश्वास । बा! उष्ण निश्वास सोडूं नको' । ऐसें जों बोले ती मंडळी मावली । तों साध्वी पावली पतीसह । भूपाहूनी बहु ब्राह्मण हर्षले । मेघसे वर्षले आशीर्वादें । राजासी ह्मणती 'आलें कीं प्रत्यया । बोलतों सत्य या सुखें वेद' ॥२८५॥ पुसतो 'वत्सा! कां विलंब लागला । नृपाळ भागला चिंताभारें' । 'शिरीं बाधा झाली फोडितां लांकडें । निजलों सांकडें पडलें हें । नाहीं जागविलें इणें घोर तमीं । सुखें घोरत मी नीजलोंच' । गौतम ह्मणे 'बा! बोलिलासि खरें । परी तत्त्व बरें नेणसी तूं । अकस्मातदृष्टीचा लाभ कैसा अंधा । गया सत्यसंधा द्युमत्सेना ॥ २९० ॥ सावित्री बाई! तूं सांग आयकों दे । स्वयें काय कोदें गेहभाग्य । ती सती तें सर्व वृत्त आयकवी । तेव्हां काय कवी विसरले । करिती ते वंदीसम स्तव मुनी । समस्त वसूनी गानविप्र । अश्वपतिकन्या सावित्री हे धन्या । असी नाहीं अन्या पतिव्रता । सावित्रीनें दोनी कुळें उद्धरिलीं । कीर्तिनें हरिलीं पापदुःखें ॥ २९५ ॥ स्तवूनी पुसोनी मनांत नमूनी । सनातन मुनी स्थळा गेले । प्रातःकाळीं प्रजा येऊनी प्रणती । करूनी ह्मणती द्युमत्सेना । तुमच्या प्रधानें मारिला अराती । सनाथा करा ती राजधानी । न्यावयासी आलें चतुरंग सैन्य । शत्रुपक्षीं दैन्य-दुःख गेलें । गौतमादि सर्व तपोधन वंदी । प्रेमें होय वंदी द्युमत्सेन ॥ ३०० ॥ करी मुक्तकरीसम स्तवनातें । समस्त वनांत प्रदक्षिणा । बैसे राजपदीं होय पूर्णकाम । तो जसा श्रीराम अयोध्येंत । सावि-

त्रीची कथा सज्जनांसी तसी । मयूरासि जसी मेघमाला । सावित्रीची कथा गातील ज्या स्त्रिया । होतील त्या प्रिया बहुमान्या । सावित्री सावित्री असें जे म्हणती । कल्याणा गणती नाहीं त्यांच्या ॥ ३०५ ॥ सावित्रीस्मरण सावित्रीपूजन । सावित्रीकीर्तन सत्यसार । पतिव्रता तरे पतिव्रता तारी । पतिव्रता नारी जगदंबा ॥ ३०७ ॥

---

॥ श्री ॥

# वटसावित्रीचें गाणें.

पहिला प्रणिपात करूं उमादेवीपुत्रा
विघ्नहरा गौरीनंदना ! देवा ! एकदंता
नमिली सरस्वती
मज द्यावी विमळा मति
तुमच्यानिप्रसादें गीत गाईन सत्यसावित्र
रत्नखचित मेखळा तुमची माणिक पूजा
एकदंता ! लंबोदरा मज वर द्या
याचीं वनें विस्तारीं अठरा खंडी प्रकारीं
काव्य गाईन सावित्री सकळांचीं विघ्नें हरती
शैल्य हा शैल्य देशींचा द्युमशेन राजा
सुप्रसन्ना देवी राणी त्याची भारजा
हस्ती हा हस्ती घोड्यांच्या असती शाळा
देशवेरी भंडार बहुत व्यापारा
राजा द्युमशेन सुप्रसन्ना देवी राणी सहित्य
दाहीजें प्रजळतीं वैरी चिंतीति आन
बाहेर काढिले त्या दोघांचे काढिले नयन

नयन काढिले दाहीं तारुण्य तयां नाहीं
दाहीं नयन काढिले हरविलें राज्यभंडार
पांच मास गर्भा बहुत कष्ट होतील मना
वनप्रवेशा निघाली सुप्रसन्ना दुमशेना
गंगासागर मिळुनियां पंथ चालती
ऋषिमातु जाणविती तयां विद्यार्थी
सर्वे नाहीं कोणी, येतो आहे दुमशेन राजा
दोघां नाहीं चक्षु सुप्रसन्न देवी राणी भारजा
पावली गंगासागरा ऋषि बहुत
साष्टांग प्रणिपात एथें करिती तात
अर्घ्य विस्तारा करीत सकळाचें अभ्यागत
येथें करावा आश्रम हाचि तुह्मा अभ्यागत
कडासन मृगासन तृणमयी शेजा
होमशाळे सुप्रसन्ना देवी दुमशेनराजा
नित्य नेम चाळती उपासनीं राया आहे ती
सुप्रसन्ना राणी आठ मास गर्भवती
पाहटेच्या प्रहररात्रीं दुमशेनें सपन देखिला
एक ब्राह्मण आला अमृतघट करीं ओपिला
नऊ मास नऊ दिवस झाले प्रसूत झाली
पुत्र झाला राया दुमशेना प्रति
ऋषि हर्षित होती आश्रमा तया नेती
ऋषीश्वरांच्या भार्या तया शुश्रूषा करिती
करीं चरणीं ऊर्ध्वरेखा सामुद्रिक लक्षणें
अंगकांति, मुख दिसत सूर्याचीं किरणें
बाहुदंड सरळ उंच वक्षःस्थळ
मज सामवे मुष्टि चरणीं राहाति फुलेंकमलें

विशाळ नेत्र कपाळीं नेमिती
अंगकांति, मुख दिसत सूर्याची का
रवि उगवल्या दीपअनु, नाहीं तयासारिखा
हा, होईल मदन ठेंगणा, द्युमशेनाच्या रूपा
स्नान करुनि राजा द्युमशेन शुचिता करी
रत्नखचित मुद्रिका मधु मुखावरी
वाढविला नाळ, आणिला सुवर्ण विळा
पाहिला पांचा वार्ता आयुष्य बळिये ह्मणती
तीन दिवसवरी सुप्रसन्ना राणी देवी बाळंती
जवाळि राखण मांडा जीवती राखण सांगा
बाळहातीं माठुला सुप्रसन्ना राखण देते दिली
पांच दिवस झाले सुप्रसन्ना देवी बाळंती
वनिंच्या वनस्पति मिळुनी जागरणा येती
रक्षा घेऊनि येती
बाळ बाळंतासी रक्षा लाविती
आरीबोरी रुई कारली ती शीघ्र आणा
जवाळि राखण मांडा
जीवती राखण सांगा
पांचवे दिवशीं जीवती जागरणा आली
अल्पायुषी भिकारी ग सठवा बोलली
विधी लिहितो भाळीं काय त्याच्या कपाळीं
पतिव्रता सावित्री धर्मकुळा उद्धरी
साहा दिवस झाले सुप्रसन्ना देवी बाळंती
वनिंच्या वनस्पति मिळुनी जागरणा येती
येती राजप्रधान अनु ना देती समाधान
रक्षा घेऊनि येती बाळबाळंतीशीं लाविती

दहा दिवस भरले सुप्रसन्ना देवी बाळंती
पुरिया उंबर वाणें तळिती
दूधतूप घेऊनि बाळबाळंतीची कूस निववितो
अकरा दिवस भरले सुप्रसन्ना देवी बाळंती
नखें चोखाळाया माल्या बोलाविती
वाढविलीं नखें न्हाली पाणियां चोखें
वाढविली न्हाणी, खोळ भरली सुईणी
माल्या दिला शेला राय मनीं हर्षित झाला
बारा दिवस झाले पुत्राचें बारसें करिती
नामकरण जातक वर्तवूनि सत्यवंत नांव ठेविती
होईल अल्पायुषी ऐसें बोलत महा ऋषी
दुःख होईल ह्मणूनि तया दोघां न सांगती
सत्यवंता बाळलेणें लेवविती
अंगुळे लाळुलें वाघनखें सरी किती
करिंच्या मणगट्या पायीं पञ्चे ढाळ देती
सत्यवंत सांवळा जनदृष्टि न पडो बाळा
अहिवा घालती रांगळी तई मोत्यांची
सोन्याचा पाट पासोडुनी ओटी भरिती
चौघी नारी उभ्या राहती
सत्यवंतासी पाळण्यांत घालिती
बारा दिवस झाले पुत्राचें बारसें कीजे
मासां मासां सुप्रसन्ना देवी पुत्र वाढविले
सामासांचा झाला अन्नप्राशन तया केलें
भरलीं अडीच वर्षे चोळें करिती हर्ष संतोषें
पांच वर्षांचा झाला ऋषि देती तया नेम
मातापितागुरुशुश्रूषा करिजे हा पुत्राचा धर्म

सात वर्षांचा सत्यवंता वनामाझारी
कशीवट कडादोरा ऋषि तया दीजे
हारिणाचें कृष्णाजिन पळसाचें दंडकाष्ठ
ऋषि मुंज बांधिती
संध्या अग्नि तया शिकविती
वर्ष दिवस नेम क्षण त्यानें चालविजे
ऋषि मुंज सोडविती शुभ्र वस्त्रें तया देती
सकळ ऋषि मिळोनि जाती आपापले आश्रमा
विनविती सुप्रसन्ना देवी दुमशेना
आह्मा दोघां नाहीं चक्षु कवीं राखावा बाळ
वनस्पति निर्मिल्या राखावा तयांचा बाळ
मार्कंडराय ऋषि एविं बोलती
कांहीं एक पश्चात्ताप राया न धरावा चित्तीं
राया तुझें होईल कार्य ऐसा ऐक महाराय
हे दिवस पालटतां राया राज्य मागुतें ग तुझें
मार्कंड ऋषि एविं बोलती
कांहींएक पश्चात्ताप तुह्मीं न धरावा चित्तीं
आशीर्वचनें देती
विजयी होवो ह्मणती
होवो आयुष्यें वळी याचना आस पुरवी
अश्वपति नरपति पुण्य पागारीं
धर्मशीळ धर्म ऐसा धर्म विचारी
महाभारत रामायणें
कथा ऐकिजे विष्णुपुराणें.
अतीत बाई पूजा यास अनु नाहीं दुजा
अश्वपति नरपति त्रिभुवनीं राजा

महादेवी अतिरूप लावण्य सुंदर भाजा
पाटाची कवणी महादेवी मृगनयनी
सहस्र विलासिनी
तिये अपत्य नाहीं कवणी
अश्वपति नरपति राजे होती
एकोदर्शे राणी तया वर्णू नाहीं मिती
धर्में प्रजा पाळिती
तयां कोणी नाहीं संतती
नवखंड पृथ्वीचें अचळ राज्य करिती
मडु मडु सईकंपित चित्रसाळिया
राज्य भुवनीं नाचणी पंकळा बाळिया
नाचण्या नाचति पुढं भेरिया वाजती
नगरीचे भट पुढें ब्राह्मण वेद पढती
हातवट चौभार विचित्र माडया
मामे भाचे वेवसार्चीं याची धवलारें
शिवक्षेत्रीं नारायण अंबिका बहु क्षेत्रीपाळ
विनायक दुर्गा अष्टदेवता हा वरदा
ओवरा ओसरी भूमि माळिवरी उपरिया
कासुनी विचित्रीं राउळीं भूमि सारविजे
माळीव ज्याच्यापरी उभविल्या यांनीं थोरा
विचित्र बळ आणी
तिथें विश्वकर्म्या विंधणी
वांसी वेणू आळविती किनरी कळी
नाचण्या नाचती पुढें भेरिया वाजती
नगरीचे भट पुढें ब्राह्मण वेद पढती
चरणीं ल्याली नेपुरें पैंजण वाळे

घातलीं दिव्य पदकें इंद्रनीळाच्या मुदिया
आंगीं सोनिया परीची काचोळी वर माणिकें
दांड त्रिबिया चरणीं ल्याली नुपुरें पैंजण वाळे
ललाटीं टिळक शोभे गळां हार बाळे
ल्याली नवलक्ष हार केला विचित्र शृंगार
चरणीं ल्याली नुपुरें पैंजण वाळे
ललाटीं टिळक शोभे गळां हार बाळे
करीं चवरें ढळती तांबीकाळ रसाळ भोवती
चालत लीळा चाली
ते येऊनि अर्धांगीं बैसली
एक ह्मणती रामचंद्राची हो सीता
एक ह्मणती उमा पार्वती हो जेवीं ललिता
इंद्रास इंद्रायणी
कृष्णास हो रुक्मिणी सकळां भ्रांत फिटली
येऊनि रामा अर्धांगी बैसली
सभांमाजीं सभा जैशी गौरवी चंद्र
गणांमाजीं ईश्वरा तूं धर्म
कुंतीकुळीं नंदन धर्मराज तसा दिसे
भासहित राजा सभेमध्यें कसा दिसे
सभामाजीं सभा जैशी गौरवी चंद्र
गणांमाजीं ईश्वरा तूं धर्म मुकुटपति प्रधान
सभा पावली इंद्राच्यासमान
रायें जोडिले कर विप्रां केला नमस्कार
घालीत गाई गोपी चारा बाळकां स्तनें
हस्तिनी देती जेवणें तीं अश्वखानें
कुवारी करती विभाव तोंचि मनीं हर्ख, होय

घालीत गाई गोपी चारा बालकां स्तनें
हास्तिनी देती जेवणें ती अभ्रखानें
विप्रां देती तांबूल, नारी लाविती कुंकुमें
कुवारी करती विभाव तोचि मनीं हर्ष होय
पित्यासवें येतील मायेसवें बाळें
जळो जीवित राजाशीं झालें तये वेळे
प्रियें न्याहाळिलें वदन रायामनीं झाली खंता
सकळ ओळगें विस्तारिजेलें ह्मणें सुप्रधारी
पुत्रविणें सकळ शून्य कोण राज्य करी
कोण राज्य करिल कोण सद्धर्म पाळील
प्रजा कवण पूजील देवा कीं द्विजां
कोण तिळांजळि देईल ? स्वर्ग कशानें पावेल ?
पुत्र देईल पित्या ओंजळी त्याणें होईल तृप्ति
जाईल गये वाराणसी त्याणें होईल मुक्ति
करितां पिंडप्रदान तेणें पावती विष्णुचें भुवन
धिक् जीवित्व भारी पुत्रविणें संसारीं
पुत्रविणें व्यर्थ चिंता करी राय
पुसे महादेवी काय करावा उपाय
मी जाईन वना
तप करूं त्वां चाळावें गृहाश्रमा
पुत्राविणें व्यर्थ चिंता करी राय
पुसे महादेवी काय करावा उपाय
घरीं येती अभ्यागत त्यांसी करावा अभ्यगत
अतीतां देईजे पूजा हा स्त्रियांचा धर्म
मी जाईन वना तप करूं तूं चाळावा गृहाश्रम
इतकें ऐकुनि महादेवी विकळित झाली

जीवें सांडूनि कुडी धरणी पडियेली
जीवें सांडली कुडी, कुडी सांडली घर
पुत्रा सांडली माता ऐसें झालें जगन्नाथा
सावध होऊनि सांष्टांग लागली पायां
पतिविणें राज्य केंवि ऐसें सांगा हो राया
हंसाविणें कुडी कुडीविणें चित्र नाहीं
देवाविणें देऊळ
तेसें स्वामिया ! तुह्माविणें राऊळ
झाडें होतील माडें देऊळ साऊली छत्रें
श्वापदें देतील किंकाळ्या तीच वाजंत्रें
रोहिणी पुष्पमाळा वारा लागतो अंगीं चंदन
वनीं वर्षतो पर्जन्य वनस्पति करिती मर्दन
कुंकुमें चंदनें तुह्मीं लावावीं अंगीं
कापूर कस्तुरी आह्मी भरावी भांगीं
तांबुल शवाळणें वल्कलें तुह्मी नेसा
दिव्यासनीं तेथें स्वामिया तुह्मीं केवी बैसा
व्याघ्र सिंह श्वापदें तेथें वनीं वसती
मालुवा भोवतीं पिंगळ घुघुत्कार मोकलिती
उन्हाळीं जरंडा पावसाळीं विजा लवती
हिंवाळा हिंवदासा
तेथें स्वामिया ! तुह्मी केंवि बैसा
महादेवी ह्मणे स्वामी माझा बोल एक करिजे
एकाभावें देवी गायत्री तुह्मी आराधिजे
वेचूं हीं भंडारें करूं यज्ञ देऊं अश्वदानें
भंडारें वेचिती आणखी गाई सहस्र देती
महादेवी अश्वपति आराधिती

देवा ब्रह्मा गायत्री
हाकारूनी परिवार ह्मणे सांगिजे
बत्तीस योजनें मंडप सूत्र धरिजे
कुंड खणावा वेगीं
हिरे जडिले अनु अनु भेगीं
कासुनि भूमि सारविती
तेथें होमांचीं एतीं करिती
कुंडें उघाडिलीं द्रव्यें काढिलीं
अश्वपतीनें परिधारें वेचूं दिधलीं
विप्रां दिलीं तांबूलें तुह्मी राज्य हें सांवरीजे
बोलावा उत्तम विप्र कुशळ
जाणाति मंत्रविधान बहुत विमळ
द्रव्य भरिलें भोरें अयुत संख्यात जाण
विप्रां दिली सूचना होम करावा तेथें रचना
महादेवी अश्वपति मंडपा येती
चोहोकोनीं गंगोदक पाटीं न्हाणिती
ऋग्वेद यजुर्वेद, अथर्ववेद सामवेद
सामवेद पढती पाई पादुका घालुनि येती
घालित गाई गोपी चारा बाळकां स्तनें
हस्तिनी देती जेवणें ती अश्वखानें
विप्रां देती तांबुलें तुह्मी राज्य हें सावरिजे
कुधारी करिती विभाव
तोच मनीं हर्ख होय
इतकें करतां तया अठरा संवत्सर होती
अग्नि गायत्रि वेद ब्रह्मा संतोषित होती
ब्रह्मा ह्मणे गायत्रि चल जाऊं राजा अश्वपति

अनुसया अरुंधती तीं सर्व शृंगार करित
मळां माळा कमंडलु पुस्तकें हातीं
आराधनीं ब्रह्मयानि ब्रह्मा चालति
आकाशाहूनि येती
मुख दिसतें सूर्याची कांति
येऊनी पुढें उभ राहाते तो राया होता अश्वपति
माग माग पुत्रा! तुझे मनीं काय आहे
इच्छिलीं फळें आह्मि देऊनि जाऊं
उघडिलीं नेत्रें पुढें पाहे ब्रह्मा श्रेष्ठ
अर्धांगी गायत्री
पार्यां लागे राजा अश्वपति
माग माग पुत्रा! तुझे मनीं काय आहे
इच्छिलीं फळें आह्मी देऊनी जाऊं
अमृत घनें करितां देवा ब्रह्मा गायत्री
दोनही कर जोडुनि विनवितो राजा अश्वपति
मी मागेन पुत्रहर्ष बोले नरनाथ
अश्वपति राया तूं मागशील कांहीं
पूर्वी पुत्रफळ तूं दिलेंस नाहीं
तुझे मनीं होय उलास
तुझा उद्धरील वंश
तुज होईल पुत्री
तिचें नांव ठेव सावित्री
सावित्रीची कळा येईल तुझ्याही गर्भी
राज्यलक्षुमी येईल तुजला सामुग्री
तुज मनीं होय उलास
तुझा उद्धरील वंश

तुज होईल पुत्री
तिचें नांव ठेव सावित्री
वरदान देऊनि मागुतीं परतलीं
अंतरीक्षीं वीज लवे तैशी गगनीं उपामिलीं
हर्खे नरनाथ येती मंडपा आंत
ऋषि करिती प्रणिपात
इछिलें फळ तुह्मां होते
आडणी परि हरी तया विस्तारिली तातें
जेवणा वेळ झाली तदा हर्खे संतोषे
अठरा खंडी प्रकारीं तया आराधणा झाली
कापूर विडे देती विप्र माणिकें थाळे भरिती
पुष्पवंती महादेवी चोखें पाणियां न्हाली
सोनेसळ शेला परिधान केली
अंगीं सोनिया पचीं कांचोळी देवदर्शना आली
दोनी कर जोडुनी आदित्य चरणीं लागली
पहिले मासा महादेवी कोणी न जाणे
दुसरे मासा सकळही जन जाणे
तिसऱ्या डोहाळे चौथ्या होती सोहाळे
भरले पांचवे मास राया मनीं आला विश्वास
महादेवी गर्भिणी डोहाळे होती
शून्य कोडे शून्यवास की दोंड
शून्याच्या काचच्या आणखी उभागें
तिळवे लाडु अमृतफळें
सर्खे बाळीशी आणि कोडे
महादेवी गर्भिणी डोहाळे होती
टिकेजडित नाग आणिक भूषणें

पाचूंचें नेसणें आणखी मोतिया जाळी
लावणीचा ऊंस कायमाय प्रकाश वर्णावया
दहीं भात भोकरें आल्याचें लोणचें
आणिक आवडल्या नारीशी डोहाळे होती
महादेवी गर्भिणी डोहाळे होती
हर्षे सांगा मातापितावंधूबहिणीशीं
द्राक्षमंडपद्वारां तिचे डोहाळे पुरले
सात मास भरले पुंसवन तिचें केलें
महादेवी गर्भिणी सुंदरी बाळा
आंबयाच्या वनीं चालला वाजंत्री मेळा
सुवर्ण हिंगुळ लांबविला डोल्हारा
केळी नारळी शुद्ध
कोकिला करिती शब्द
कौतुकें माय वाढी शाखा परवडी
खाज्या करंज्या अनारसे तक्राची कडी
धूप तूप वाट्या भरी सुंदर आळविल्या खिरी
वडेपापड आळणे वर वाढिलीं सुवर्ण वरणें
महादेवीला दृष्टि झाली मंत्री प्राचारा
जवळि सख्यावशा उभ्या लिंबलोणउतारा
भयभीत अश्वपति विंझणे मारिती दासी
आठमास भरले बाळीचें वठंगुळ करिती
उंबराची माळ गळां घालिती
होमरक्षा लाविती गर्भाची शुद्धता करिती
पहांटच्या प्रहररात्रीं अश्वपति सपन देखे
माझे राउळी तेविला लांवण दिवा
स्त्रिया लक्ष्मी येती

त्या राउळी खेळ खेळती
नऊमास नऊ दिवसां प्रसूत झाली
बत्तीस लक्षणी सावित्री कुवारी जन्मली
नगरियें हर्षवत पुत्र झाला राजा अश्वपति
वाधावें वाजती
मंगळमार्जनें तिये करती
नगरीचे लोकां हाकार केला
तेव्हां योगिये पातले सहस्र बारा
ह्मातारे अतिवृद्ध ते पातले सोळा सहस्र
सावित्री भाग्यवंत तुह्मांकारणें दानें हो फार
अन्नदानें भूमिदानें गजदानें करती
अनेक पात्रें तिलक पात्रें अनसूया करती
दहाही महादानें घरीं अन्नोदक सहस्रवार
सावित्री भाग्यवंत तुह्मांकारणें दानें हो फार
स्नानें करूनि अश्वपति राजा शुचिता करी
नवरत्न मुद्रिका मधु मुखावरी
पाठविलें नाळ आणिला सुवर्ण विळा
पाहिली पांचा वाती
राय ह्मणे कुवारी पद्मीण जैशी
तीन दिवस भरले नाहाली हो बाळंती
जवळि राखण मांडा
जीवती राखण सांगा
बाळाची माउली महादेवी राखण दिलदिते
पांच दिवस भरले महादेवी बाळंती
अहिवा नारी कुरवंड्या करती
रक्षा काजळें देती

महादेवी होय तेज सुवंती
बोले राजा अश्वपति
बाळरक्षा करा कुवारे सावित्री
ब्रह्मा ह्मणे ग देवते माये
राया-राऊळीं जाये ग सये
कुवारी अक्षर घालीं
कीं बळीयानारी गोमटीं
तीन दिवस विधवापणं पुराणी सावित्री नारी
ब्रह्मयाचें वचन ऐकुनि नारीनें शृंगारकेला
कासे कायेला
शिरदोख कशिला
ल्यायली भांग टिळा ल्याली सुंदरी
अश्वपतीचे घरा जीवती जागरणा आली
अश्वपतीचे घरा जीवती आली
सावित्रीनें देखीयली!
सावित्रीनें धरियेले जीवतीचे पाय
आतां मागुतीं जाय विश्वाचे गाळी होय
विश्वाचे गाळी कशानें होय
माळी ग मळा राखी
त्याचे पाणी सरोवरा जाय
एकवृक्ष पीकतील एक फुकट वाया जाती
एकवृक्ष पीकतील ते सर्वांचे उपकारा पडती
सहा दिवस भरले महादेवी बाळंती
अहीवा नारी कुरवंड्या करती
रक्षा काजळें देती
महादेवी होय तेज सुवंती

बोले राजा अश्वपति
बाळरक्षा करा कुवारे सावित्री
आरी बोरी रे कारली शीघ्र आणा
कांडकी कशावरी करती जीवती जागरण
अपविल्या द्विजा
अष्टदेवतांची करतो पूजा
रात्रीं वर्ग ह्मणती रक्षाविधान कुवारी करती
हाकारा जो केला सीते सुने
त्यांनीं आणिली गंगेची वाळू
सोनिया घड मांडिती
पोवाळिया घेट वळिती
तो घड वाजविती
बाळबाळंतीचीं सठी जागविती
दहा दिवस भरले महादेवी बाळंती
पुरीया उंबर वाणें टाळती
तुपदूध घेउनि बाळबाळंतीची कूस निववितो
अकरा दिवस भरले महादेवी बाळंती
नखें चोखाळाया माल्या बोलाविती
वाढविलीं नखें न्हाली पाणियां चोखें
वाढविली न्हाणी
खोळ भरली सुईणी
माल्या दिला शेला
राया मनीं हर्ष झाला
अकरा दिवस भरले, चोखें माणियां न्हाली
सोनेसळ शेला परिधान केली
अंगीं सोनेपचीं कांचोळी, सूर्यदर्शना आली

दोन्ही कर जोडुनियां आदित्यचरणीं लागली
बारा दिवस भरले कीं हर्षित होती
बाराशा एतीं करा बोल, राजा अश्वपति
कांडे करंडे घातले त्यांहीं
सकळी नगरी आत्र केली
मंगळ मार्जनें झालीं
बारशा एतीं केलीं
भरलें दोनप्रहर अज्ञानि न करती यज्ञ
भरले दोनप्रहर अज्ञानि न आणिती अग्न
ऋषि मंत्र ह्मणती
अहिवा मंगल गाती
बोले राजा अश्वपति
बाळरक्षा करा कुवारी सावित्री
अवचित पाळणा आणिला विश्वकर्म्यानें
तो विणला पाट सुतानें
मोत्यांची भोवरी
हा पाळणा राजकुवारी
पाळणा-खांब आणिला इंद्रें
तो घडविला विश्वकर्म्यानें
महा विष्णुनें लांबविला
ब्रह्माविष्णु वरि केला चांदवा
झेंडु केला प्रजापति
बाळनिद्रा करि कुवारी सावित्री
सावित्रीशीं बाळलेणें लेववितीं
अंगुलें लोळुलें वाघनख सरी
डोई पिंपळपान कानीं तोंगलें बरवीं शोभती

अहिवा घालती रांगोळी तिये मोत्यांची
सोनिया पाट मांडुनि ओटी भरिती
चौघी नारी उभ्या राहती
सावित्रीसी पाळण्यांत घालिती
बारा दिवस भरले पुत्रीचें बारसें कीजे
मासा मासा महादेवी पुत्री वाढविजे
सामासांची झाली अन्नप्राशन तिये केलें
आनु वर्षे भरलीं अंगणीं क्रमीत चाले
चाचर केश बागड
अंगीं लेववितो आंगी
दोही बाही घटाणिया चांगी
पुत्री माझी खेळेन चामकली हंसगती
राया मनीं हर्ष तीचा
हीचि भांडारें देईन दुर्गदेशा
चाचरे केशांची बांधली जुडी अखंड भोंवरी
लेकरांचा खेळ खेळे सावित्री कुवारी
घरीं दुधावणी
पाचारिल्या संगातिणी
बहुत अचपळ सावित्री खोडिया करिते
जाई जुई नागचाफे मोडिते
महादेवी धरी वाहीं
ह्मणे पुत्रि ! स्थिर ग होई
चरणीं ल्याली नेपुरें पाई दु वाळे
ललाटीं टिळक शोभे गळां हार वाळे
घातलीं दिव्य पदकें इंद्रनिळाच्या मुद्रिया
अंगीं सोनियापर्वी कांचोळीवर माणिकें

दांड तुंबिया
सावित्रीचे कोवळे पाय कोवळे शब्द
पोवळ्याचे वेल अधर तैसे सुरंग
कंसनया चमेली
अंगीं जवादी चर्चिली
सावित्रीशीं उपमा हाराची दिधली
सावित्रीचे कोंवळे पाय जशीं रातीं कमळें
पोटरिया केळी गाभ पनरा सोडिले
पोट भळंग पातळ
वाटोळिया बाहीं सरळ
सरळ अंगुळिया
वर नवरत्न मुद्रिका जाळिया
नखें केतकीपत्रें
जशीं उगवलीं नक्षत्रें
नेसली दिव्य पत्रमान शिरदोख शेला
सकळिकें उपमा मेदिनी दिधली तिला
जांघ्या कर्दळीखंब कडसूत्र इंद्राची रंभा
पांच वर्षांची झाली
अश्वपतिमनीं चिंता वर्तली
अश्वपति ह्मणे–पुत्रि! वर वरूं जाय
सावित्री ह्मणे ताता! भला दिवस पाहे
बोलाविले जोशी उत्तम मुहूर्त पुसती
तिथि पंचमी ते दिवशीं सोमवारीं मुहूर्त सांगती
निशाण तावें असावें कुरूळ कासाळी
तुरबाळिया काहिली पुढें पायदळ भेरी
धवळा आळवण पुढें धवळे शंख वाजती

माता पित्याचीं चरणें वंदुनि
प्रयाण केलें हो कुवारी सावित्री
सावित्रीचा रथ चाले गगनीं मार्ग
देव वृष्टि करिती हर्षे आनंद
वैकुंठाशीं देव बघुनि उभे राहती
सिंहासनीं बैसवूनी पूजा करिती
लक्ष्मी भरी ओटी सत्यवंत बसला पाटीं
दाहीं नयन काढियेले गर्भिणी नारी
हिरविलीं राज्य भंडारें वनप्रवेशा आली
देखला सत्यवंत मातापित्याची शुश्रूषा करि
सत्यवंत देखिला, हाचि पति मनीं वरिला
वर वरूनियां मागुति परतली
राया–राऊळीं मातु जाणविली
निशाणसवें भेरी राया! पावली तुमची कुवारी
मांडिये बैसवूनी हर्ष सांगिये पुत्रि!
कोण वर वरिये सावित्रि!
हर्ख देखावा ताता
विस्तार सांगतें आतां
दाहीं नयन काढियले गर्भिणी नारी
हिरविलीं राज्यभंडारें वनप्रवेशा आली
देखला सत्यवंत मातापित्याची शुश्रूषा करी
सत्यवंत देखिला
हाचि पति मनीं वरिला.
इतकें ऐकुनि मातापिता गहिवरूं आलीं
काय माये? एकली गेलीस, कोण वर वरिला
भले मंत्री प्रधान जोशी तुजसवें गेले

वर वरते वेळे ते काय निद्रिस्त झाले
इतकीं चिंता करितां तेथें नारद आला.
बसाया सिंहासन दिजे
मग पुत्रीला पुसिजे
का राया! दीन वदन प्रियवदन कोमलें
काय तुमचें राऊळीं वितलें तें नारद पुसे
मोठी उपवर झाली वर वराया गेली.
जाचनांचा पुत्र वर वरूनियां आली
इतकें एकुनि वचन नारद बोलला
अल्पायुषी भिकारी वर वरिला
पुत्रि! मागुति जाई
वर वरीं सुभट क्षत्री
सावित्री ह्मणे ताता? ऐसा न घडे विचार
एक पति मनीं वरिला दूजा नव्हे भ्रतार
सत्यवंत नवरा. आग्रहाल तरी सेवीन वैश्वानर
इतकें एकूनि वचन नारद बोलिला
अल्पायुषी भिकारी ग वर वरिला
ज्येष्ठ मासाचे वरी आयुष्याचें तया भरण
चतुर्दशी दोनप्रहरीं सत्यवंता आहे मरण.
सत्यवंत जाई वना तूं जाई ग सरशी
प्राणत्याग होईल चतुर्दशीचे दिवशीं
येईल मरण वनीं. न विसंबशी भ्रतारा.
गगनीं होईल ख्याती
तुझा नेतील ग पति
देव हर्षित होती तुझाच ग तुला देती
इतकें बोलूनि नारद तत्क्षणीं गगनीं उपमला

गगनीं उपमला गेला धर्मराजाशीं
अश्वपतीच्चिया कन्येचा पति घेऊनि येशीं
तिचा द्यावा भ्रतार ती आहे थोर तपाची
इतकें ऐकूनि मातापित्यांवर गुज पडलें
धीर धरतां फळ लाभे ऐसें सावित्री बोले
विवाहाची एतीं करिजे
मनीं इष्ट देवता ध्याईजे
महादेवी वऱ्हाडियांचा करी हाकारा
सावित्री नवरी तिनें निश्चय केला
सर्व शृंगार करा
तुह्मी वऱ्हाडा जावया चला
बळी चतुरंगपाळ आणिले मागुती हे हत्ती
डोळिया डोळ झापणावरी झालरी छत्रें
भंडारी करावरी बाहिलें.बाहुलें
पेणतील हो पेण ऋषि झाले जुगंत
सत्यवंत ह्मणे तात
वनीं परचक्र आलें बहुत
अश्वपतिरायें पाठविलें द्विजां
स्वस्थ होतील जाचना मग करूं पूजा
बोले राजा अश्वपती
सत्यवंता देऊं सावित्री
राजर्षि ह्मणती नरवीरनाथा !
राजकन्या केविं थाल आमचिये पुत्रा
आह्मी अंध दाळिद्रें, एथें नाले भिल्ल असती
सुकुमार पुत्री वनीं कंदमुळें केवीं भक्षी
सावित्री ह्मणे ताता तुमचे घरीं मी असेन सुखें

तुह्मांघरचीं नेसेन वल्कलें तींच देवांगें
तुमची करीन शुश्रूषा तीच राज्यसंपदा
वनींचीं वनफळें खाईन
तोंचि मनीं सुख ध्याईन !
मुहूर्त पाहूनि मंडपा खांब घालिती
जोशी बोलावूनि मंडपसूत्र धरिती
येती ऋषीच्या घडणी
त्या जाण मंडपां ठेवणी
वाजंत्र्यांचा नाद घुमतो वनामाझारी
साखर सुपारी वाटिती सुंदरी
वाङ्‌निश्चय करिती
नवरी भीतरि नेती
मग सुप्रसन्ना सावित्रीशी
तेलसाडी नेसवित
जाई जुई आणिल्या बहुत
केळी नारळी पोफळी साहित्य
मांडिला गौरिहार वरी
कस्तुरीचा वास ग दिला
आली महादेवी तिनें गौरीहार प्रतिष्ठिला
अहिवानारी गंगेचीं उदकें आणिती
पंचामृतें करूनि गौरी पूजिती
वधू वस्त्र नेसाविती गौरिहारीं बैसविती
रुखवताची ऐतीं केलीं कोणीयेपरी
परड्या भरूनि ठेविल्या बाहेरी
वडे फेण्या गुरवळ्या
वर मांडायच्या ठेविल्या घड्या

जिलब्या गुरवळिया
बरव्या केल्या करंजीया
अनरसे चखोट
वळवट वाळिले बहुत
सगळीं ऐतीं झालीं
रुखवता घेऊनी चालली
रुखवत वाढुनि मागुनि आली
सख्यावशासहित मांडवीं बैसली
वरमाये पाचारी
नवऱ्या रुखवत वाढी
रुखवत वाढूनि मागुती आली
प्रधानाशीं बोलावूनि कानीं लागली
तुह्मी स्वामींशीं सांगा
अर्धी वराचीं मायबापें पूजा
मग वर पूजुनि हस्तिणीवर बैसवा
अश्वपतीनें वराशीं वस्त्रें वाहिला
शिरजोख नेसविला
तखतीं पैराव केला
शिरीं मंदील बांधिला
शिरीं शिरपेंच माथां मोतियांचा तुरा
वरमूळा चालिनल्या अहिवा नारी
धवळे शंख वाजती नादाळ भेरी
बरें करिजे नाहणें
हर्षे वाजत बांधावनें
देखा ऋषिकुळा सहित
परिणूं निघाला सत्यवंत

सत्यवंत परिणूं जाय शकुन होती
दुरडिये लाडु पुढें हातवे येती
सत्यवंतरायावरी मोरचलें चवरें ढळती
राजा प्रजांसहित अश्वपती दुमसेन चाले
ब्राह्मण ते वेदघोष पुढें बहुत लागले
मागें पुढें अहिवा मध्यें सुप्रसन्ना महादेवी
पुढें वाजत मंडपीं भेरी दारा पावली
मंडपदारा पावला वरा उतारिती
पाई घडा ग घालिती
शिरदोख शेला मध्यें अंतरपाट धरिती
सुटला अंतरपाट त्या दोघां झालें सावधान
सत्यवंता सावित्रीशीं लागलें लग्न
ऋषि मंत्र ह्मणती
अहिवा मंगळ गाती
बोले राजा अश्वपती
जन्मा अहिवा होय सावित्री
सुटला अंतरपाट त्या दोघां मिक्षाल्या दृष्टी
विमानीं देव पाहती करिती पुष्पांच्या वृष्टी
ब्रह्मा विष्णू महेश्वर रवि चंद्र इंद्र प्रजापति
सकळिक आशीष देती
जन्मा अहिवा होय सावित्री
आहिवा नारी गंगेचीं उदकें आणिती
कन्यादान करी महादेवी अश्वपती
ओंजळीवरी ओंजळी हात ओले पाघळती
कुळगोत्र उच्चारीती
कन्यादान झालें ह्मणती

महादेवी ह्मणे स्वामी ! वचन ऐकिजे
जें कन्ये आंदण बोलिलें तें एथें देईजे
रंगित पाळणा सवें चालत तान्ह्या गाई
सावित्री चाले तिच्या मागें दासीच्या हारी
ब्रह्मसूत्र गळां घातिलें चारी वेद
शुद्ध पवित्रें करा शिरीं कंकण बांध
वर आला मंडपदारा
आराधिला नवरा
पीतांबर वस्त्रें अनंत मुद्रिका ल्यायला
सतत पूजा भोंवती बाळें
अंगुष्ट धरावया बहीण बोलावां
अग्नि प्रज्वालितां वेळीं
सात वर्षांचा बाळी तेथें झाला
लाह्याहोम द्यावया सत्यवंत चाले
सावित्री करी चिंता
निपुत्रीक माझा पिता
वैश्वानर प्रार्थिला
बारा वर्षांचा बाळ तेथें झाला
सूनमुख पाहूं आली सुप्रसन्ना देवी
हाकारी महादेवी आणि सावित्री कुवारी
हर्षे मांडिये घेतली
शीघ्र कारलें आणा, सूनमुखा वेळ झाली
बहु लिया पाट मांडिला तोही सोनियाची
ताट वाटी ठेवियली हिरे रतनाची
वधुवर बैसले पंगती
महादेवी आली

घृत आपोशन घाली
भहुलीया पाट मांडिला तोही सोनियाचा
ताट वाटी ठेवियेली हिरे रतनाची
बहुवर बैसले पंगती
सुप्रसन्ना जेवताती
सावकाश ह्मणताती
आडणीं परियाणी तया विस्तारिलीं ताटें
जेवणा वेळ झाली हर्षे संतोषें
अठरा खंडी प्रकारी
आरोहण तयां झाली
कापूरविडे देती
विप्र पाणिकें थाळे भरिती
वाजंत्रीपायड्याशिरींगिरी विहिणी चालती
मंडपीं येऊनी उभ्या राहती
चंदनी चांखण्या करिती
विहिणींशीं उद्वांती
सुप्रसन्ना देवीला खंबायत नेसवीती
उंच चौरंगी सुप्रसन्ना देवी बैसवीती
दूध गुळ घेऊनी महादेवी चरण प्रक्षाळी
करवलीचा मान सुप्रसन्ना ठेवीं घंगाळीं
दुमत्सेन म्हणे लक्षुमी न्यावी घरांशीं
आलेली पालखी बैसविलें सावित्रीशीं
मागें पुढें अहिवा, मध्यें सुप्रसन्ना महादेवी
पुढें वाजत भेरी, मंडपदारा पावली
मंडपदारा पावली, वरा उतरीती
मग वराच्या बहिणी दारें धरावया येती

दारें धरूनीयां काय बोलती
पहिली कन्या होईल द्यावी आह्माला ती
मग सुप्रसन्ना सावित्रीचें नांव घेऊं सांगती
घरांत नेऊनी हाराडेरा उघडिती
नवरत्नहार सावित्रीचे गळां घालिती
चारी दिवस भरले, विवाह झाला हर्षसंतोषें
साडे सुती पायां लागे राजा अश्वपति
बहु अपराधी आहे पुत्रि
क्षमा करावी कुवारी
सासूचे जेवणा अंग धुवविजे
सासऱ्या देवाऱ्हा होमकुंड सारविजे
अगमुनि आणि
नित्य चाळी दुमसेन
सासूसासऱ्याची शुश्रुषा करिजे हाच तुझा धर्म
तीन पावलें मातापित्या बोळवाया आली
पुत्रि मागुती जाई, जाचना वाट पाहती
मागुती पेण केलें आपलिया देशा
नगरीप्रवेश करतां नारी भरतील शेषा
रायाराउळीं प्रवेश करतां स्त्री गेली
छत्र मालती दंतांचे चुडे ल्यायिली
ताडाचीं ताडपत्रें गळां ल्यायली गळसरी
त्या वनामाझारी सावित्री दिसे गोजिरी
सत्यवंत जाई वना, वनफळें घेउनी येई
गुरूंची सेवा करते सावित्री राणी
आंत बाहेर हिंडत आहे
भ्रताराची वाट पाहे

सत्यवंत जाई वना, वनफळें आणितों हर्खें
चंद्रवदना मृगनयना येतांना देखे
कंथा सामोरी आली
बघुनि हर्खित झाली
चांगलीं हीं वनफळें सावित्री घेई निवडून
आधीं करीं भोजन स्वस्थ होईल तुझें मन
आह्मी तिघें बसूं पंगती
मग वाढ आह्मा सावित्री
सावित्री ह्मणे ताता ऐसा न घडे विचार
तुह्मा तिघांवांचून आधीं न करीं भोजन
तुह्मा तिघां वाढीन, भ्रतारा पात्रीं जेवीन
हा जो ज्येष्ठ दिवस आला
नारदाचा बोल पतिव्रते मनीं आठवला
तिनें निश्चय केला
त्रिरात्र नेम घेतला
सावित्री सत्यवंताशीं बोले मातु
तुह्मी समिधार्थ जाल
वनफळें घेऊनी याल
तुमच्यानि प्रसादें सकळींचीं वनें देखेन
सत्यवंत ह्मणे ताता ! ही येते वनाशीं
उन्हें श्रमेल, क्लेश पावेल ही राजपुत्री
तूं कां कोमशील ? तुजविण न गमे सावित्री
उपासाचा श्रम नाहीं ऐसें बोले सावित्री
स्वामी ! तुमचा हात धरला त्यानें कष्ट नाशत
ऐकावें कल्याण
मज द्यावें जीवदान

काढिले हारे दोरे पायींचें इंदू
माझिया चुडयांना राखण गोविंदु
तातानें घडविले चुडे
चुडे घडिले सोनारें
चुडे आयुष्यबळी ते फिटती कोणियापरी
इतके बोल सासूसासऱ्यांनीं ओंवाळिले
शिरकमळीं
इतके बोल सावित्री कैसे तुह्माजवळी ?
मनीं आहे, अभ्यास शिकवितो सत्यवंत
मनींचीं मंगळें सावित्रि तुझ्या कथा होत
सुताचा गुंजावा करी शुद्धला
दंताची फणी तिनें परंवटीं खोविली
करीं घेतला भिंगारा
गंध अक्षता कुंकुमें पत्रीं
प्रयागवडा निघालीं सत्यवंत
धरणी ( बरोबरी ) सावित्री.
हातीं हात धरोनियां तीं दोघें चालती
सर्पें वाट खांडिली आज सावित्री
सत्यवंत ह्मणे सावित्री अपशकुन तुज देखा
सावित्री ह्मणे कंथा वनीं वनस्पतींची रक्षा
हा देख बाभळीचा वृक्ष करवंदी जाळी
येथें मृग झुंजले त्यांची सांडली कस्तुरी
कर्दळी लवंडल्या
कापुराच्या राशि झाल्या
मिऱ्या पिंवळें वेली नागवली कां चिंधल्या
देखा मोठा सुर तो

आपल्या सुराचे ऐतें दैत्यां करती
हरिण कांडोळितो हर्षे ग रोहिणीअंगें
मुख कर्पुर मार्जे मग आपण बैसला मागें
जळामध्यें क्रिडा करतो
मंजुळ शब्द आळविती चालविती
अशा सुंदर स्त्रिया त्या पुरुषा दुल्लभ होती
पुष्पामध्यें उत्तम पारिजातक
तैसा पुरुषांमध्यें मी उत्तम सत्यवंत
पुष्पांमध्यें शेवंती तैशी स्त्रियांमध्यें तूं उत्तम
सावित्री
गजे सोंड पाणी घेतलें स्त्रिये धूतलें पाठी
वनामध्यें तूं कौतुक पाहि सखये सावित्री
सत्यवंत ह्मणे सावित्री भागलीस राजपुत्री
इथें वट शिंपिजे आहिवीं दान मागिजे
हातपाय धुऊनी तिणें सुवर्ण कलश भरिला
होमाविणे आदित्य अर्घ्य जो दिला
रातेतांदळाच्या अक्षता
बहु आयुष्य होवो सत्यवंता
स्वामी आज दिवस तुमचा
आज पति राखावा माझा
कुंकुमें चंदनें शिंपी भरूनियां चाले
गंगेचे तटिये तिनें अंग धुतलें
तिनें निश्चय केला
प्रयागीं वट शिंपिला
दुरी न जावें कंथा आवई वना
माझ्या दृष्टि असावें दुमत्सेननंदना

सावित्री जवळी समिधा तों खांडुं लागला
सत्यवंता पायीं विषाचा कांटा मोडला
तळव्या जाळ सुटला, शिरीं तिडीक निघाली
मागें पाहे तों सावित्री देखे एकली
माझीं प्राणप्रियाळी
अपशकुनें मी आणिली
वनिं श्वापदें नेती, तरी काय सांगूं अश्वपति
समिधांचा भारा घेतला शिरीं, तिडीक निघाली
थोर सायासें पातला प्रियेजवळी
वना आलीस सरशी
बोलूं न गमे ग तुजशीं
शिर:कमळ ठेविलें चरणि, वाचा खुंटली
इंद्रियां भंग झाला सावित्री डचकली
रुसलेत कांहीं कंथा ?
मशीं बोलाना सर्वथा
तुह्मांसरशी आलें वनीं एकुली सांडिलें
अश्वपति बापें सातवेळां निरविलें
शिर:कमळ ठेविलें धरणि. वाचा खुंटली
अश्वगज पल्लव हातरिले कंथा तळीं
दाही दिशा निहाळी
सावित्री धाय मोकली
रोदन करतां पडली मागुती
तिशीं देखुनि धावल्या वनिंच्या वनस्पति
त्यांहीं बैसली केली धीर धरीं ग राजपुत्रि
धर्मापाठीं लागुनि भ्रतार आणी सावित्री
तयांच्या बोलाचा मनीं आला विश्वास

एकली वनीं असतां कोणी न देखिला पुरुष
अवसरणी वाचा झाली ह्मणती धीर धरी
राजपुत्रि
सांखेल जरी कंथ तरी कार्य नासेल ग सावित्री
राखीं राखीं जगन्नाथा, सोमनाथा,
दुर्बळिये आज पति राखावा माझा
विंध्यवासिणी अंबे,
तुज घडवीन सोन्याचे चुडे
महांकाळी महासरस्वती त्या राखती तिचे चुडे
तहतीस कोटी देवलिंगा बांधीन पूजा
दुर्बळिये आज पति राखावा माझा
विंध्यवासिणी अंबे,
तुज घडवीन सोन्याचा पुरुष
महांकाळी महासरस्वती ऐसें बोलियली
यमेंकिंकर पाठविले सांवळा हातीं
महासुर भयाभीत वावर ओठ
भयासुर मुख पायीं पहा कोण दैवत
सतीच्यानि तेजें भस्म गेले ग दिगंत
अडखुळलों भ्यालों ह्मणती ते पतिव्रते
राया परीस विनंति वचन देऊं आह्मी आजु
सतीच्यानि तेज राया जाईल तुमचा मान
महिषासुर पालाणुनी चाले धर्मराया
कोण वचनें देऊं आतां हाच उपाय
पीतांबर वस्त्रें करीं घेतलीं योग्य शस्त्रें
क्रोधें दुरी आला
सतीच्यानि तेजें विपरीत गेला

दुराचि उभाराहिला हती साष्टांगें पाया लागली
दुरुनि ती साष्टांगें लागली पाया
कोपोनिया कशालागीं आलासि राया
व्रतें उपवासी मी उपवास रोकडे
उपवास रोकडे धर्म राखावे माझे चुडे
खदखदां शब्दें हांसे ह्मणे मूर्ख नारी
पसरूनियां कुडी कुडींतून आत्मा काढी
पुरुष अंगुष्ठमात्र प्रदक्षिणा करितो
देखिले सावित्रीनें सत्यवंत प्राण काढितो
सत्यवंता खांदीं वाहूनि चाले धर्मराज
कुडी ठवूनी सावित्रीनें नम घेतला ।
जरी त्याहीन पति तरी जाईन मागुती ।।
क्रोधें उभी राहिली भोंवती रेषा ओढिली
येथें हात घालील त्याला शापूनी भस्म करी
वडाचा पार तो अति सुंदर
त्याखालीं निघेल मुंग्याचें विवर
वडा लाविली शिडी वडावरी ठेवी
निरविल्या वनस्पति येथें क्रिडा करी ग सुंदरी
सत्यवंता खांदां वाहुनी चाले धर्मराज
मागुतीं पाहे तो सावित्री येत!
धर्म ह्मणे ग माय मी धरीं तुझे ग पाय।।
आतां जाई मागुती धर्म ह्मणे ग सावित्री
मागुती जाऊनी बैसावें कोणाच्या दारीं
माझी मातापिता तीं आमुच्या हरवे
काय करिती भिकारी निपुत्रिकें ।
शतवरी पुत्र देईन ग अश्वपति राया

जाई ग सावित्रि मागुती त्यांच्या ग ठायां
तुझे बंधु ते ग होती अचळिचें राज्य करिती ॥
आतां जाई मागुती धर्म ह्मणे ग सावित्री ॥
मोजलेंच देईल माता मोजलेंच देईल पिता
मोजलें बंधु सकळ गोतावर अंधा एकचि पुत्र
तो तु घेऊनि जाशी मग ते काय करिती
अंधां होतील लोचनें नवें तारुण्य
जाऊं दे सावित्रि मज करूं दे कारण
अंधां लोचनें येती कोईए राज्य करिती
आतां जाइ मागुती धर्म ह्मणे ग सावित्री
मागुती जाऊनी बैसावें कोणाचिये दारीं
भ्रतारावीण भोग हे कैसे भोगावे
पुत्रा होतां विवाह तेव्हां पुसती वराची माया ॥
मरणापरीस भारी, कष्ट होतील तिथें नारी ॥
इतकें दिलें तरी पुरत नाहीं
अधिक आगळें करासिल तरी
तुझ्या भयानें पळेन ग सावित्री
पळशील राया तरी माझें काय घेऊन जाशी
सत्यवंता नेऊं नेदी ऐसें बोले सावित्री ॥
जरी त्याहीन पति तरी जाईन मागुती
न देशी सत्यवंत तरी हाचि करीन महापंथ
धरणी मेधू परश मेधू चंद्रसूर्य लवती कंपती
देवा हव्यकव्य न पावती कुवाराचीं लग्नें राहतीं
धर्मराजा दोष घडती ॥
हस्तीस नाहीं खाणें, बालका नाहीं स्तनें
लिंगा नाहीं पूजा, एवढा धर्मराजा दोष तुझा

ओंवऱ्याची करीन शिळा उंबऱ्याची करींन खाई
धर्मा तुझ्या राऊळीं करीन स्मशानें
उगों नेदी सूर्य सृष्टि पडेल अंधकार
इचा प्रताप थोर या बोला नाहीं विचार
ओसरीवरी मांडली खाई
यमरायाची राणी आली बाहेरी
धर्म सावित्री अश्वपतीची मी पुत्री
पतिकारणें मी आलें, बेसलें तुझी चाड
धर्मराजाच्या दारीं अग्नीचा खांब
सावित्रीनें गिळूं पाहे, धर्मराज हास्य करी
सावित्रीनें कवटाळीला, धर्मराज डचकला
येई पतिव्रते भ्रतार नेई आपला
धर्मराजाचे दारीं अग्नीचें हरण
सत्यवंता कारणें सावित्रीनें अंगाविलें मरण
येई पतिव्रते भ्रतार नेई आपला
महा ऋषींनीं भाकिलें. तें नटळे मिथ्या
सत्यवंताकारणें घालील हत्या
उघडला अनंत पंथा, आयुष्य होत सत्यवंता
स्त्रिया पतीची जीवनें जीवनें हर्वे
विशदा विशदा ऐसें धर्मराज बोलला ॥
धाकुटियेपणीं बुद्धि आगळी थोर पराक्रमी
तुझीं व्रतें करिती त्याशीं वर देईन ग सावित्री
तेहतीस कोटी देव विमानासरसे चालती
धर्मराज ह्मणे छळिलेंस सखये सावित्री
ऐसें न ह्मणावें राया ह्मणूनी साष्टांगें लागली पायीं
तुह्मीं दिला भ्रतार हाचि तुमचा उपकार

तेहतीस कोटी देव विमानासरसे चालती
धर्मराज ह्मणे छळिलेंस सखये सावित्री
तूंच मातापिता तूंच सर्वहि ताता
कृपा करावी ताता सत्यवंता प्राण सोडितां
सोनियाच्या पाउवा पायीं त्यायिला
कागासुर बळियासुर पालाणुनी चालला
तुळशी उदकें घालुनी चरणीं प्रक्षाळूं लागला
सावित्रीनें जाऊनी चरणांवरी माथा ठेविला।
मध्यभंग मोडुनी सत्यवंत उठे
विमानीं देव पाहती करिती पुष्पाची वृष्टी
ब्रह्मा विष्णु महेश्वर रवि चंद्र प्रजापति ॥
सकळिक आशिका देती जन्म अहिवा होय सावित्री
सत्यवंत ह्मणे सावित्री सपन देखें
श्यामवर्ण पुरुष मजजवळी आला।
तो त्यानें मज खांदा वाहुनी नेलें तेव्हां
तूं होतीस तया सरशी
स्वभावें बोलतां, गोष्टी करतां तुज देखें
हें काय सावित्री, मजपुढें सांग राजपुत्रि
चाहविल तर दाखविन प्रचीति ॥
आहिवा वनस्पति. त्याही वनीं क्रीडा करती ॥
त्यांचीं सांडलीं फुलें, ऐसें सावित्री बोले।
अंधां करावी प्रीति, त्याची न करी क्षिती ॥
कृतार्थिणी झालीस आली वनासरशी
तिसरा उपवास तुज घडला संकटीं।
मज लागली निद्रा तुझी प्रिये व्यापिली क्षुधा
व्यापियेली क्षुधा शिरीं अहंकार व्यथा

भरली मध्यन्हीये जातां कशी करू चिंता
दिन मध्यान्हीं आला अभिमन्यु रात्र भरली
द्युमत्सेन ह्मणे सुप्रसन्ना देवी
आह्मा दिव्य चक्षु आले पहा केवी
त्रिकाळ देतसों होम गार्हपत्य झाले प्रसन्न ॥
द्युमत्सेन ह्मण सुप्रसन्न देवी
अझून न पावता सून नी पुत्र ।
सत्यवंत सत्यवंत ह्मणती, दाही दिशा हिंडती
सांडिलें रानीं तुह्मां दुःख काय तें मनीं
सत्यवंताशी बोलते मातु तुमची मातापिता आह्मा
दोघां शुद्ध सरू आली ॥
दिव्य सरोवरीं आसगळीं बैसली
तुझा पिता राज्यधर, ऐसें बोले सत्यवंत ।
माझिया स्वजना हासशील तुज घडेल दोप
गी हास्य करितां ह्मणुनी खड्ग
न धरावें सावित्री ॥
चहावेल तरी दाखवीन प्रचीती
अविचारी बोल बोलिले सत्यवंत राव ॥
चौघे मिलाफ झाले दोघे साष्टांग पायां लागले
द्युमत्सेन ह्मणे कां कोपलासी पुत्रा
सत्यवंत ह्मणे ताता, माझा दुखतसे माथा
सावित्री ह्मणे हा तात हा आहे वडिल वृत्तांत
अश्वपति होम घ्यावया चाले कुंडे उघाडिलीं
शतवरी पुत्र पाहूं पांचा वाती
कापूराविडे देती, विप्र माणिकें थाळे भरिती
इतकी चिंता करितां तेथें नारद आला

भाजेसहित अश्वपति राजा चरणीं लागला ।
पुत्रीनें केली क्षांती, स्वर्गाहूनी आणिला पती ॥
पित्या केले शतपुत्र अंधां केलीं लोचनें ॥
वेगें होऊं द्या पारणें, सावित्री होऊं द्या पारणें ।
अश्वपति चढे हत्तिणीवरी महादेवी बैसे दांडिये
पुत्र बैसती सुखासनीं सर्व चालती विलासिनी
पण केलें डोळिये सहस्र बैसणें घोडिये
द्युमत्सेन ह्मणे रजनगड उडतो
सत्यवंत ह्मणे ताता, असा अश्वपति येतां
चौघे मिलाफ झाले, दोघे साष्टांग पायां लागले ॥
मांडिये बैसवूनी हर्षे सांगिजे पुत्री
स्वर्गाहूनि पति आणिला सर्व सावित्री
बहु हर्षतो चित्तीं तिनें सोडिली शकुनगांठी
महादेवी मेहुण्यातें हाकारा करी
इंद्रासवें इंद्रायणी, कृष्णासवें रखुमिणी ॥
भानुसवें रन्नादेवी, चंद्रासवें पावली रोहिणी
आणारे पेटे, काढारे ताटें
जेवणा वेळ झाली तया हर्ष संतोषे
अठरा खंडी प्रकारी आरोदण तया झाली
कापूर विडे देती, विप्र माणिकें थाळे भरिती
हा देखा ब्रह्मगिरी चतुर्मुख नृत्य करितो
दैत्य प्रचंड आले, वेद हिरावुनी नेले
देवी पार्वतीनाथाचें नित्य स्मरण मीं केलें
हा देखा ब्रह्मगिरी चतुर्मुख नृत्य करितो
ब्रह्मा कंपीत झाला कोणा मी जाऊं शरणा
असे लक्ष्मीपति मज कमलापति सृष्टिचा राणा

ऐका देवा चंद्रावळीनें कथिली सावित्री
हरिचरणीं मज द्यावी भक्ति मुक्ति
देवी पार्वतिनाथाचें करीन निरंतर स्तवन
सावित्रीचीं आख्यानें गाती
पतिसहित चौदा भुवनें राज्य करिती
देवी पार्वतीनाथ मज कमळापति प्रसन्न होती
॥ इति श्रीसत्यसावित्रिकथागीतम् शुभंभवतु ॥



४

## वटसावित्रीची आरती

(चाल—आरती ज्ञानराजा)

अश्वपती पुसता झाला । नारद सांगती तयाला ।
अल्पायुषी सत्यवंत । सावित्रीनें कां प्रणीला ।
आणखी वर वरीं बाळे । मनीं निश्चय जो केला ।
आरती वडराजा ॥ १ ॥
दयावंत यम दूजा । सत्यवंत ही सावित्री ।
भावें करीन मी पूजा । आरती वडराजा ॥ ध्रु० ॥
ज्येष्ठमास त्रयोदशी । करिती पूजन वडाशीं ।
त्रिरात्रि व्रत करूनीयां । जिंकीं तूं सत्यवंतासीं ॥ २ ॥
आरती वडराजा ॥ २ ॥
स्वर्गावरी जाऊनीयां । अग्निखांब कवळीला ।
धर्मराज उचकला । हत्या घालील जीवाला ।
येईंगे पतिव्रते । पति नेईंगे आपुला ॥
आरती वडराजा ॥ ३ ॥
जाउनीयां यमापाशीं । मागतसे आपला पती ।
चारी वर देऊनियां । ह्मणे जाईं गे मागुती ।
मागें न जाईं यमराया । दयावंता द्यावा पती ।
आरती वडराजा ॥ ४ ॥
पतिव्रते तुझी कीर्ती । ऐकूनी ज्या नारी येती ।
तुझीं व्रतें आचरती । तुझीं भुवनें पावती ।
आरती वडराजा ॥ ५ ॥
पतिव्रते तुझी स्तुती । त्रिभुवनीं ज्या करीती ।
स्वर्गीं पुष्पवृष्टी करूनीयां । आणिलासी आपला पती ।
अभय देऊनीयां । पतिव्रते तारीं त्यांसी ।
आरती वडराजा ॥ ६ ॥